श्री

# धर्मसिंधु

याचें

## मराठी भाषांतर

(अनुष्ठानें व व्रतादिकांतील संकल्प मंत्र वगैरे सहित)

हें पुस्तक

## रावजी हरि आठवले

## पुरुषोत्तम गोपाळ शेट

याणीं



अलीबाग येथें

"सत्यसदन" छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

चैत्र कृष्ण ९ शुक्रवार शके १८००

संवत् १९३४ सन १८७८



किंमत ८ रुपये.

# प्रस्तावना.

आपला धर्म व आचार यांचें यथार्थ ज्ञान होण्यास धर्मशास्त्राची माहिती असणें अवश्य आहे. परंतु ते ग्रंथ संस्कृत भाषेंत असून अर्वाचीन काळीं संस्कृत भाषेचा अभ्यास लोकांत कमी झाल्यामुळें त्या ग्रंथांचीं महाराष्ट्र भाषेंत भाषांतरें केल्यावांचून लोकांस त्यांचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं हें जाणून धर्मसंबंधी सर्व गोष्टींचें ज्यांत विवेचन केलें आहे अशा **धर्मसिंधु** नामक ग्रंथाचें भाषांतर करून तें देशबांधवांस सादर केलें आहे.

**भाषांतराची पद्धति**—हें जरी भाषांतर आहे तथापि अनुष्ठानादि प्रसंगीं ज्या ज्या ठिकाणीं संकल्प, मंत्र, त्याग व अन्य उच्चार करावयाचे त्या त्या ठिकाणीं ते संस्कृतांतच ह्मटले पाहिजेत यास्तव त्यांचें भाषांतर न करितां ते " " अशी खुणा करून त्यांमध्यें लिहिले आहेत. तसेंच ग्रंथकारानें आपल्या ग्रंथांत जीं अन्य ग्रंथांतील वचनें घेतलीं आहेत त्यांचें भाषांतरहि वरील प्रकारचे खुणांतच लिहिलें आहे; आणि कित्येक दुर्बोधशब्दांपुढें( )अशी खुणा करून त्यांत त्या शब्दांचा स्पष्टार्थ सांगितला आहे. अशी एकंदर भाषांतराची पद्धति आहे.

रा० ह० आ०

**सूचना**—हा माझा भाषांतर करण्याचा प्रथम प्रयत्नच असल्यामुळें न्यूनाधिकाकडे लक्ष न देतां विद्वानांनीं यांतील दोष टाकून गुण ग्रहण करावे अशी माझी त्यांस प्रार्थना आहे.

भाषांतर कर्त्ता.

# अनुक्रमणिका.

## भाग पहिला.

## भाग दुसरा.

## भाग तिसरा.

(पूर्वार्ध)

16121

श्री

# धर्मसिंधूचें मराठी भाषांतर.

॥ श्रीगणेशायनमः श्रीपांडुरंगायनमः ॥

## ॥ श्रीगुरुदेवदत्त. ॥

ईश्वरप्रार्थना.

श्रीविठ्ठलंसुकरुणार्णवमाशुतोषंदीनेष्टपोषमघसंहतिसिंधुशोषं
श्रीरुक्मिणीमतिमुषंपुरुषंपरंतंवंदेदुरंतचरितंत्हृदिसंचरंतं १

**अर्थ**—करुणेचा सागर, त्वरित संतोष पावणारा, दीनांचें इच्छित पुरवणारा, पातक समुदायरूपी जो समुद्र त्याचा नाश करणारा, श्रीरुक्मिणीचें चित्त हरण करणारा परम पुरुष, ज्याच्या चरिताला पार नाहीं असा, व हृदयाचे ठायीं वास करणारा, असा जो श्रीविठ्ठल त्याला नमस्कार करितों.

वंदेप्रनिघ्नंतमघानिशंकरंधत्तांसमेमूर्ध्निदिवानिशंकरम्
शिवांचविघ्नेशमथोपिनामहंसरस्वतीमाशुभजेपिनामहम् २

**अर्थ**—पातकांचा नाश करणारा व कल्याण करणारा असा जो शंकर त्याला नमस्कार करितों. तो शंकर सर्वकाळ माझ्या मस्तकीं वरद हस्त धारण करो. पार्वती, गणपति, ब्रह्मदेव व सरस्वती यांनाही मी त्वरित नमस्कार करितों.

श्रीलक्ष्मींगरुडंसहस्त्रशिरसंप्रद्युम्नमीशंकपिं
श्रीसूर्यंविधुभौमविद्गुरुकविच्छायासुतान्षण्मुखम्
इंद्राद्यान्विबुधान्गुरूंश्चजननींतातंत्वनंताभिधं
नत्वार्यान्वितनोमिमाधवमुखान्धर्माब्धिसारंमितं ३

**अर्थ**—श्रीलक्ष्मी, गरुड, सहस्र मस्तकांचा असा शेष, प्रद्युम्न, ईश्वर, मारुती, श्रीसूर्य, चंद्र, मंगळ, बुध, बृहस्पति, शुक्राचार्य, शनि, षडानन, इंद्रादिदेव, गुरु, आणि माता, व अनंत नामक पिता, तसेच माधवप्रमुख श्रेष्ठ, यांस नमस्कार करून मी धर्माब्धिसार नांवाचा ग्रंथ करितों.

दृष्ट्वापूर्वनिबंधान्निर्णयसिंधुक्रमेणसिद्धार्थान्
प्रायेणमूलवचनान्युज्झित्वालिखामिबालबोधाय ४

अर्थ—प्राचीन ग्रंथ अवलोकन करून प्राय: त्यांतील मूळ वचनें सोडून निर्णय सिंधूच्या क्रमानें त्यांचे प्रसिद्ध अर्थ आबालवृद्धांस बोध व्हावा एतदर्थ मी लिहितों.

# वर्ष, अयन वगैरे कालाचे भेद.

वर्ष, अयन, ऋतु, महिना, पक्ष (पंधरवडा) आणि दिवस असे कालाचे साहा भेद आहेत. चांद्र, सौर, सावन, नाक्षत्र, आणि बार्हस्पत्य, असें पांच प्रकारचें वर्ष आहे. शुक्ल प्रतिपदेपासून अमावास्ये पर्यंत एक महिना या मानानें चैत्रादि संज्ञक जे बारा महिने ह्मणजे ३५४ दिवस यांनीं व अधिक मास असतां तेरा महि न्यांनीं चांद्र वर्ष होतें. चांद्रवर्षालाच प्रभव, विभव, शुक्ल, इत्यादि ६० संज्ञा आ हेत. मेषादिक बारा राशी सूर्यानें भोगिल्या असतां ३६५ दिवसांनीं सौर वर्ष होतें. ३६० दिवसांचें जें वर्ष त्याला सावन असें ह्मणतात. पुढें सांगण्यांत येतील असे जे बारा नाक्षत्र महिने ते भरल्यानंतर जें वर्ष होतें त्याला नाक्षत्र वर्ष ह्मणतात. हें ३२४ दिवसांनीं होतें. मेषादिक दुसऱ्या सर्व राशी अनुक्रमानें बृह-स्पतीनें भोगिल्या असतां जें वर्ष भरतें त्याला बार्हस्पत्य असें ह्मणतात. हें ३६१ दिवसांनीं होतें. कर्मादिकांच्या संकल्पांत चांद्र वर्षाचाच उच्चार करावा. अयन दोन प्रकारचें. एक दक्षिणायण व दुसरें उत्तरायण. सूर्याच्या कर्क संक्रांती पासून साहा राशींचे भोगानें दक्षिणायन व मकरसंक्रांती पासून साहा राशी भोगिल्या ह्मणजे उत्तरायण होतें. ऋतु दोन प्रकारचे. सौर आणि चांद्र. मीनापासून किंवा मेषापासून सूर्यानें दोन दोन राशी भोगिल्या असतां वसंतादि साहा प्रकारचे सौर ऋतु हो तात. चैत्रापासून आरंभ करून दोन दोन महिन्यांनीं होणारे जे वसंतादि सहा ऋतु ते चांद्र ऋतु होत. अधिक महिना असल्या तर किंचित् कमी अशा ९० दिवसांनीं चांद्र ऋतु होतो. श्रौतस्मार्तादि कर्मांत चांद्रऋतूचा उच्चार प्रशस्त होय. मास चार प्रकारचा—चांद्र, सौर, सावन आणि नाक्षत्र. शुक्ल प्रतिपदे पासून अमावास्या धरून किंवा कृष्णप्रतिपदेपासून पौर्णिमा धरून भरणारा जो तो चांद्रमास. त्यांत शुद्धप्रतिपदेपासून भरणारा तो मुख्य. कृष्णप्रतिपदेपासून भरणारा तो विंध्या द्रीच्या उत्तरे कडेस मानतात. कर्मादिकांचे ठायीं शुद्ध प्रतिपदेपासून भरणाऱ्या चैत्रादि मासाचा उच्चार करावा. मीन संक्रांतीपासून सौरमासांना चैत्रादि संज्ञा आ हेत असें कोणी मानितात. सूर्यसंक्रांतीपासून पुढच्या सूर्यसंक्रांती पर्यंतचा जो मास तो सौर मास होय. तीस दिवसांचा तो सावन मास. अश्विनी आदीकरून २७ नक्षत्रें चंद्रानें भोगिलीं असतां जो मास होतो त्याला नाक्षत्र मास ह्मणतात.

प्रतिपदेपासून पौर्णिमेचे अखेरी पर्यंत जे दिवस तो शुक्लपक्ष. प्रतिपदेपासून अमावास्येचे अखेरीपर्यंत जे दिवस तो कृष्णपक्ष. ६० घटिकांचा एक दिवस. ॥ याप्रमाणे धर्मसिंधुसारांतील पहिला उद्देश झाला. ॥

# संक्रांतींच्या पर्वकालाचा निर्णय.

मेष सूर्य संक्रांतीच्या पूर्वीच्या १५ व पुढच्या १५ घटिका पुण्यकाळ. कोणी दाहा दाहा घटिकाही मानतात. वृषभ संक्रांतीच्या पूर्वीच्या १६ घटिका पुण्यकाळ. मिथून संक्रांतीच्या पुढच्या १६. कर्काच्या पूर्वीच्या ३०. सिंह संक्रांतीच्या पूर्वीच्या १६. कन्येच्या पुढच्या १६. तुला संक्रांतीच्या पूर्वीच्या १५ व पुढच्या १५ घटिका पुण्यकाळ. कोणी दाहा दाहा घटिका मानतात. वृश्चिकेच्या पूर्वीच्या १६. धनु संक्रांतीच्या पुढल्या १६ घटिका. मकरसंक्रांतीच्या पुढच्या ४०. कुंभसंक्रांतीच्या पूर्वीच्या १६ घटिका. मीनसंक्रांतीच्या पुढल्या १६ घटिका पुण्यकाळ. दोन घटिकांहून किंचित् कमी इतका दिवस शेष राहिला असतां मिथुन, कन्या, धन, मीन व मकर या संक्रांती होतील तर पूर्वींच्याच घटिका पुण्यकाळ. प्रातःकाळीं दोन घटिकांहून कमी अशा वेळीं वृषभ, सिंह, वृश्चिक कुंभ व कर्क या संक्रांती होतील तर पुढच्याच घटिका पुण्यकाळ. प्रातःकाळीं कर्क संक्रांत झाली असतां कित्येक पूर्व दिवशीं पुण्यकाळ मानतात. मध्यरात्रीच्या पूर्वी संक्रांत झाली असेल तर पूर्वींच्या दिवसाचें उत्तरार्ध पुण्यकाळ. मध्यरात्री नंतर संक्रांत झाल्यास पुढच्या दिवसाचें पूर्वार्ध पुण्यकाळ. बरोबर मध्यरात्रीच संक्रांत होईल तर पूर्व दिवसाचें उत्तरार्ध आणि पुढच्या दिवसाचें पूर्वार्ध अशा दोन दिवशींही पुण्यकाळ. मकर आणि कर्कसंक्रांती खेरीज करून बाकीच्या संक्रांती रात्रीं होतील तर हा शास्त्रार्थ जाणावा. मकरसंक्रांत रात्रीं होईल तर दुसऱ्या दिवशीं पुण्यकाळ. कर्कसंक्रांत रात्रीं होईल तर पूर्वींच्या दिवशी पुण्यकाळ. सूर्यास्ता नंतर तीन घटिका पर्यंत सायंसंध्याकाळ, ते वेळीं मकरसंक्रांत झाली असतां पूर्व दिवसीं पुण्यकाळ. सूर्योदया पूर्वी तीन घटिका प्रातःसंध्याकाळ, ते वेळीं कर्कसंक्रांत झाल्यास दुसऱ्या दिवशीं पुण्यकाळ. या प्रमाणे संध्याकाळीं संक्रांत झाली असतां त्याचा विशेष निर्णय ज्योतिःशास्त्रांत प्रसिद्ध आहे.

# वरील प्रसंगीं करावयाचीं दानें.

मेष संक्रांतीस मेषदान, वृषभ० गोप्रदान, मिथुन० वस्त्र व अन्नादिदान, कर्क० घृतधेनुदान, सिंह० छत्र व सुवर्णदान, कन्या० गृह आणि वस्त्रदान, तुला० तीळ व गोरसदान, वृश्चिक० दीपदान, धनु० वस्त्र व वाहनदान, मकर० काष्ठ व अग्निदान,

कुंभ० गाई उदक व तृणदान, मीन० भूमी व माळा यांचीं दानें करावीं. या प्रमाणे आणखीही दानाचे प्रकार आढळतात. मकर, कर्क, मेष व तुला या संक्रांतीचे ठायीं पूर्वी त्रिरात्र किंवा एक रात्र उपोषण करून स्नान दानादि करावें. शेवटील उपोषण संक्रांतियुक्त अहोरात्रीं किंवा पुण्यकालयुक्त अहोरात्रीं जसें होईल तसें करावें. हें उपोषण पुत्रवान् गृहस्थाश्रमी खेरीज करून इतरांनीं पापक्षयार्थ करावें. हें काम्य आहे, नित्य नाहीं. सर्व संक्रांतीचे ठायीं पिंडरहित असें श्राद्ध करावें. मकर व कर्क संक्रांतीचे ठायीं श्राद्ध नित्य आहे. ज्या प्रमाणें त्या त्या संक्रांतीचे ठायीं दानादिक करावीं म्हणून सांगितलें त्याच प्रमाणे त्या संक्रांतींच्या पूर्वी अयनांशकालीं त्या त्या संक्रांतीस उचित अशीं स्नानदानादिक करावीं. अयनांश ज्योतिःशास्त्रांत सांगितले आहेत. ते अयनांश सांप्रतकाळीं शालिवाहन शके १७१२ मध्यें २१ आहेत, म्हणून संक्रांतीच्या पूर्वी एकविसाव्या दिवसीं अयनांश पर्वकाल होतो असा शेवटील अर्थ जाणावा. या प्रकारें करून अधिक उणा शक असला तथापि जाणावें.

## संक्रांतीस विष्णुपदादि संज्ञा.

वृषभ, सिंह, वृश्चिक आणि कुंभ या संक्रांतीस विष्णुपद असें म्हणतात. मिथुन, कन्या, धनु आणि मीन यांना षडशीति संज्ञा आहे. मेष, तुला यांस विषुव म्हणतात. कर्क आणि मकर यांना अयन अशी संज्ञा आहे. या चार प्रकारचे संक्रांतीचे ठायीं उत्तरोत्तर म्हणजे एकाहून दुसरी जास्त पुण्यकारक आहे. मंगल कार्याचे ठायीं बहुधा सर्व संक्रांतींच्या पूर्वीच्या व पुढच्या १६, १६ घटिका वर्ज्य कराव्या. चंद्रादि संक्रांतींच्या ठायीं पूर्वीच्या व पुढच्या मिळून क्रमानें २, ९, २, ८४, ६, १६० घटिका टाकाव्या. रात्रीं संक्रांत झाली असतां ग्रहणा प्रमाणें रात्रींच स्नानदानादिक करावें असें कित्येकांचें मत आहे. रात्रीं संक्रांत झाली असतांही दिवसासच स्नान करावें, रात्रीं करूं नये असें सर्वमान्य संमत असून देशाचारही बहुधा असाच आहे. ज्याच्या जन्मराशीला सूर्य संक्रांत असेल त्याला धनक्षयादि पीडा होते म्हणून त्याच्या परिहारार्थ त्यानें कमल पत्रानें युक्त अशा पाण्यानें स्नान करावें. विषुव व अयन या संक्रांती दिवसास झाल्या असतां पूर्वीची व पुढची रात्र आणि तो दिवस पढविण्यास व पढण्यास हीं वर्ज्य होय; आणि रात्रीं झाली असतां पूर्वीचा दिवस, पुढचा दिवस व ती रात्र हीं वर्ज्य जाणावीं. या प्रमाणें संक्रांति झाली असतां बारा प्रहर पर्यंत अनध्याय, असें तात्पर्य. आणखीही विशेष निर्णय अयन संक्रांतीचे प्रसंगीं सांगण्यांत येईल. ॥ या प्रकारें करून संक्रांत जाणावी. उद्देश २१. ॥

# मलमासाचा निर्णय

मलमास दोन प्रकारचा आहे. एक अधिक मास आणि दुसरा क्षय मास. संक्रांति रहित तो अधिकमास आणि दोन संक्रांतींनीं युक्त तो क्षय मास. पूर्वींच्या अधिक महिन्या पासून पुढचा अधिक महिना होणें तो तिसऱ्या महिन्या पासून आठव्या किंवा नवव्या महिन्यांत कोणता तरी होतो. १४१ किंवा एकोणीस वर्षांनीं क्षय मास होतो. अधिक महिन्या प्रमाणें अल्प काळानें होत नाहीं. क्षय मास येणें तो कार्तिक, मार्गशीर्ष व पौष या महिन्यांतून कोणता तरी येतो. यांखेरीज दुसरे येत नाहीं. ज्यावर्षीं क्षय मास होतो त्या वर्षां मध्यें दोन अधिक मास होतात. एक क्षय मासाच्या पूर्वी, आणि एक क्षय मासा नंतर.

# अधिक मासाचें उदाहरण.

चैत्र अमावास्येला मेष संक्रांत. पुढें शुद्ध प्रतिपदे पासून अमावास्ये पर्यंत संक्रांत नाहीं. नंतर शुद्ध प्रतिपदेला वृषभ संक्रांत झाली, तेव्हां याच्या पूर्वीचा संक्रांति रहित जो महिना तो अधिक वैशाख होय. वृषभ संक्रांतियुक्त जो तो शुद्ध वैशाख जाणावा.

# क्षयमासाचें उदाहरण.

भाद्रपद कृष्ण अमावास्येला कन्या संक्रांत. पुढे आश्वीन अधिक मास. शुद्ध आश्वीन महिन्याचे प्रतिपदेला तुला संक्रांत. कार्तिक शुद्ध प्रतिपदेला वृश्चिक संक्रांत. नंतर मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला धनु संक्रांत, व याच महिन्याचे अमावास्येला मकर संक्रांत. या प्रमाणे धनु संक्रांत आणि मकर संक्रांत या दोहोंनीं युक्त जो एक महिना त्याला क्षय मास असें ह्मणतात. तो मार्गशीर्ष व पौष हे दोन महिने मिळून एकमास होतो- त्याच्या प्रतिपदादिक ज्या तिथी त्यांचे पूर्वीचें अर्ध मार्गशीर्ष व पुढचें अर्ध तो पौष मास होय. या प्रमाणे सर्व तिथी दोन महिन्याच्यां होत. या महिन्या मध्यें तिथींच्या पूर्वार्धांत मृत झाला असेल तर त्याचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध मार्गशीर्षांत व उत्तरार्धांत मृत झाला असेल तर पौषांत करावें. या प्रमाणें जन्म झाला असतां वाढ दिवसादि विधीही तसाच करावा. त्यानंतर माघ अमावास्येला कुंभ संक्रांत पुढें फाल्गुन अधिकमास. शुद्ध फाल्गुनाच्या शुक्ल प्रतिपदेला मीन संक्रांत आली. या प्रमाणें पूर्वीच्या व पुढच्या दोन अधिक मासांनीं युक्त असा क्षयमास ज्या वर्षीं येतो तें वर्ष तेरामहिन्यांचें होऊन तीनशें नव्वदांत किंचित् कमी इतके त्याचे दिवस होतात. क्षयमासाच्या पूर्वींचा जो अधिक महिना त्याला संसर्प असें ह्मणतात. हा सर्व कर्मास योग्य असून शुभ कार्याविषयीं त्याज्य नाहीं. अंहस्पति संज्ञक क्षयमास आणि त्याच्या पुढचा होणारा अधिकमास हे

सर्व कर्मांच्या ठिकाणीं वर्ज्य होत. त्याचप्रमाणे तीन वर्षांनीं येणारा जो अधिकमास तो ही वर्ज्य होय.

# वरील महिन्यांतील वर्ज्यावर्ज्य कर्मांचा निर्णय.

ज्यांना दुसरी गती नाहीं ह्मणजे जीं जेव्हांचे तेव्हांच केलीं पाहिजेत अशीं जीं नित्य, नैमित्तिक आणि काम्य कर्मे तीं अधिक मास व क्षय मास यांचे ठिकाणीं करावीं. ज्यांना सवड आहे अशीं नित्य, नैमित्तिक व काम्य कर्मे वर्ज्य होत. ह्मणजे असें— संध्या, अग्निहोत्र इत्यादि नित्य कर्मे; ग्रहणस्नान इत्यादि नैमित्तिक; आणि पर्जन्या करितां कारीर्यादिक व राक्षसांच्या नाशार्थ रक्षोघ्नेष्टि, इत्यादि काम्य कर्मे अधिक मासांत ही करावीं. ज्योतिष्टोम इत्यादि नित्य कर्मे, जातेष्टि इत्यादिक नैमित्तिक कर्मे आणि पुत्रकामेष्टि इत्यादि काम्य कर्मे हीं मल मासा नंतर शुद्ध महिन्यांतच करावीं. . पूर्वीं आरंभिलेलें असें काम्य कर्म अधिक मासांत ही करावें. नवीन आरंभ किंवा समाप्ति करूं नये. तसेंच, पूजेचा लोप वगैरे झाल्यामुळें पुनः मूर्तिप्रतिष्ठा करणे; प्राप्तकालाचे ठायीं अवश्य केलेच पाहिजेत असे जे गर्भाधाना पासून अन्नप्राशनापर्यंतचे आठ संस्कार; ज्वरादि रोगांची शांति; अलभ्य योगाचे ठायीं श्राद्ध व्रतादिक, नैमित्तिक प्रायश्चित, नित्यश्राद्ध, ऊन मासिकादिक श्राद्धें आणि दर्शश्राद्ध, हीं अधिक मासांत ही करावीं. चैत्रादिक अधिक महिन्यांत कोणी मेले असतील आणि कदाचित् फार दिवसांनीं तोच चैत्र मास अधिक महिना आला तर त्या अधिक मासांतच त्याचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावें. चैत्रादिक शुद्ध महिन्यांत मेलेल्याचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध अधिक महिन्यांत करूं नये. शुद्ध अशा चैत्रादिकांतच करावें. शुद्ध महिन्यामध्यें मेलेले असतील त्यांचे पहिलें वर्षश्राद्ध अधिक महिन्यांतच करावें, शुद्ध महिन्यांत करूं नये. दुसऱ्या वर्षाचें श्राद्ध शुद्ध महिन्यांतच करावें. पहिल्या दिवसा पासून अकराव्या पर्यंतचें जे एकादशाहांत कर्म आणि सपिंडी कर्म हीं अधिक महिन्यांतही करावीं. दुसरें मासिकादिक श्राद्ध अधिक मास व शुद्ध मास यांत दोनदा करावें. याप्रमाणे बारावें मासिक जर अधिक महिन्यांत आलें तर त्याची अधिक व शुद्ध महिन्यांत द्विरावृत्ति करून ऊनाब्द काळीं ऊनाब्दिक करून चवदावे महिन्यांत पहिलें वर्षश्राद्ध करावें. ज्या वर्षीं क्षय मासाच्या जवळ अधिक मास होतो, ह्मणजे ज्या प्रमाणे कार्तिक अधिक मास, त्याच्या पुढील महिना वृश्चिक व धनुसंक्रांतींनी युक्त असल्यामुळें तो क्षय मास होय. तेव्हां त्या कार्तिक महिन्यांतील प्रतिसांवत्सरिक श्राद्ध पूर्वीच्या अधिक महिन्यांत करून पुढच्या क्षय मासांतही करावें. जे वेळीं क्षय मासा पासून दूर पूर्वी अधिक महिना होतो, ह्मणजे जसा आश्विन अधिक मास व मार्गशीर्ष क्षय मास, ते वेळीं आश्विन महिन्यांतील श्राद्ध

अधिकांत व शुद्ध आश्विन महिन्यांतही करावें. कारण दोन्हीही महिने कर्माला योग्य आहेत असें वाटतें. दुसऱ्या क्षय मासांतील वर्षश्राद्ध क्षय मासांतच करावें. याच प्रमाणे पूर्वी सांगितलेलें जें मार्गशीर्ष क्षय मासाचें उदाहरण यांत, मार्गशीर्षांतील व पौषांतील जें अधिकश्राद्ध तें एकाच महिन्यांत करावें. तिथीचे पूर्वार्धादि विभाग करूं नये असा इत्यर्थ.

# मलमासांतील वर्ज्य कर्मे.

उपाकर्म, उत्सर्जन, अष्टकाश्राद्धें, हीं अधिकांत करूं नयेत. चौलें, मुंज, लग्न, तीर्थयात्रा, देवयात्रा, घर बांधणें, गृहप्रवेश, देवाची अर्चा, विहीर, तलाव, बाग, यांचा उपसा, नवें वस्त्र व अलंकार धारण करणें, तुलापुरुषादिक महादानें, यज्ञ कर्म, अग्नीची स्थापना, पूर्वी केलें नाहीं असें देवाचें व तीर्थाचें दर्शन, संन्यास, काम्य असा वृषोत्सर्ग, राज्याभिषेक, व्रतें, जे करण्यास पुढें काल आहे असे अन्न प्राशन व सोडमुंज हे संस्कार, पुढें ठेवण्यास सवड नाहीं असा नामकर्मादि संस्कार, पवित्रें वाहणें, दमनार्पण, श्रवणाकर्म, सर्पबली आदिकरून पाकसंस्था, शयन, कुशीस वळणें इत्यादि उत्सव, शपथ घेणें, दिव्य करणें, हीं सर्व मलमासामध्यें वर्ज्य करावीं. रजोदोषशांति, विच्छिन्न झालेल्या अग्नीचें पुनः संधान करणें, त्याची प्रतिष्ठा करणें, इत्यादि जीं नैमित्तिक कर्मे तीं जर निमित्तामुळेंच कर्तव्य असतील तर त्या ठिकाणीं मलमासाचा दोष नाहीं. उक्त काल टळलेला असेल तर तीं शुद्ध महिन्यांतच करावीं. आग्रयण करावयाचें तें दुष्काळा सारखें एखादें संकट असल्यास अधिक महिन्यांत करावें. एरवीं शुद्ध महिन्यांत करावें. युगादि आणि मन्वादि श्राद्धें दोनही महिन्यांत आवृत्तीनें करावीं. क्षयमासाच्या पूर्वीचा संसर्प नांवाचा जो अधिक महिना पूर्वी सांगितला आहे, त्यामध्यें चौलें, मुंज, विवाह, अग्नीची स्थापना, यज्ञसमारंभ, महालय व राज्याभिषेक हीं वर्ज्य होत. दुसरीं वर्ज्य नाहींत. नवीन व्रताचा आरंभ व समाप्ति अधिक महिन्यांत होत नाहीं. पूर्वी आरंभिलेलें जें माघस्नानादिक त्याचा आरंभ व समाप्ति अधिक महिन्यांत होते. मकर संक्रांतीनें युक्त जो क्षयमास त्याच्या पौर्णिमेस माघस्नानाचा आरंभ करून कुंभ संक्रांतीनें युक्त जी माघमासांतील पौर्णिमा तिचे ठायीं त्याची समाप्ति करावी. या प्रमाणेच कार्तिक महिन्यांतही समजावें. ज्या वर्षी वैशाखादिक अधिक महिना येतो तेव्हां वैशाखस्नानादिक जीं मासव्रतें त्यांचा चैत्र महिन्याच्या पौर्णिमेला आरंभ करून शुद्ध वैशाखाचे पौर्णिमेस समाप्ति करावी. या व्रतादिकांचें दोन महिने अनुष्ठान होय. जें कर्म मलमासांत वर्ज्य सांगितलें तें गुरु व शुक्र यांचा अस्त, बाल्य आणि वार्धक्य यांचे ठायींही वर्ज्य जाणावें. अस्ताच्यापूर्वी सात दिवस वार्धक्य व उदया

नंतर सात दिवस वर्ज्य, असा मध्यमपक्ष आहे. पंधरा, पांच व तीन दिवस इत्यादि जे पक्ष ते आपत्तिकाल व अनापत्तिकाल इत्यादि परत्वें व देशपरत्वें योजावे. हा वर्ज्यावर्ज्य निर्णय सिंहस्थ गुरु असतां जाणावा.

# सिंहस्थ गुरु असतां विशेषेंकरून वर्ज्य कर्में.

कान टोंचणें, चोळें, मुंज, विवाह, देवयात्रा, व्रतें, घर बांधणें, देवप्रतिष्ठा आणि संन्यास हीं अवश्य वर्ज्य जाणावीं.

# सिंहस्थ गुरूचा अपवाद.

मघा नक्षत्राचे ठायीं किंवा सिंहांशीं गुरूचा योग असतां सर्व देशांमध्यें कोणतींही मंगल कार्यें करूं नयेत. सिंहांशा नंतर गोदावरीच्या दक्षिणेस, व भागीरथीच्या उत्तरेस सिंहस्थाचा दोष नाहीं. गंगा व गोदावरी यांच्या मध्यभागीं जो देश आहे तेथें तर सर्व सिंहस्थामध्यें विवाह व मुंज हीं करूं नयेत. इतर कर्में सिंहस्था नंतर सर्व देशामध्यें करावीं. मेष राशीचा सूर्य असतां सर्व देशांमध्यें सर्व मंगल कार्यें करावीं. त्यांस सिंहस्थाचा दोष नाहीं. वृषभराशीचा सूर्य असतांही दोष नाहीं असें कोणी ह्मणतात. सिंहस्थ गुरु असतां गोदावरीचें स्नान आणि कन्यागत गुरु असतां कृष्णेचें स्नान हीं पुण्यकारक जाणावीं. गोदावरीच्या यात्रेला जाणारांनीं क्षौर व उपोषण हीं अवश्य करावीं. तिच्या तिरीं राहणारांस याची गरज नाहीं. गर्भिणी स्त्री असतां किंवा विवाहादि मंगल कार्य झालें असतांही गोदावरीचे ठिकाणीं क्षौर केलें असतां दोष नाहीं. गया व गोदावरी यांचे यात्रेच्या ठिकाणीं अधिक मासाचा व गुरुशुक्रास्तादिकांचा दोष नाहीं. मलमासाचा विशेष निर्णय दुसरे ग्रंथांत सांगितला आहे. ॥ या प्रकारें करून धर्मसिंधुसारांतील तिसरा उद्देश झाला. ॥

# तिथींच्या निर्णयाविषयीं सामान्य परिभाषा.

तिथि दोन प्रकारची. एक **पूर्णा** व दुसरी **सखंडा**. सूर्योदयापासून साठ घटिका असणारी जी ती पूर्ण तिथी. इच्या खेरीज जी ती सखंडा. **सखंडाही** दोन प्रकारची आहे. एक **शुद्धा** व दुसरी **विद्धा**. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत राहणारी, तसेंच शिवरात्री इत्यादिकांचे ठायीं मध्यरात्री पर्यंत राहणारी ती शुद्धा. तिच्या खेरीज जी ती विद्धा. वेध दोन प्रकारचा. **प्रातर्वेध** व **सायंवेध**. सूर्योदयानंतर साहा घटिकांनी पहिल्या तिथीचा दुसऱ्या तिथीला स्पर्श होतो तो **प्रातर्वेध**. सूर्यास्ताचे पूर्वी साहा घटिकांनी पूर्व तिथीचा दुसऱ्या तिथीला स्पर्श होतो तो **सायंवेध**.

एकादशीव्रता विषयींचा वेध त्या प्रकर्णी सांगण्यांत येईल. कित्येक विशेष तिथींचे ठायीं वेध जास्त सांगितला आहे:—पंचमी बारा घटिकांनीं षष्ठीला विद्ध करिते. दशमी पंधरा घटिकांनीं एकादशीला विद्ध करिते. चतुर्दशी ११ घटिकांनीं पौर्णिमेला विद्ध करिते. विद्धातिथि कितीएक कर्मांविषयीं ग्राह्य व कित्येकां विषयीं त्याज्य होतात. संपूर्ण तिथि व शुद्ध तिथि यां विषयीं संशय नसल्या मुळें बहुधा त्यांचा निर्णय सांगण्याची गरज नाहीं. निषेध केलेली जी सखंडा तिथि तिचाही निर्णय सांगण्याची गरज नाहीं. कारण "निषेध ह्मटला ह्मणजे तो निवृत्तिरूप असून कालमात्राचीच अपेक्षा करितो" असें जें वचन, त्याचे योगानें अष्टमी आदिकरून तिथींचे ठायीं केळें खाण्याचा जो निषेध आहे त्याला ते वेळीं मात्र व्याप्त असणाऱ्या तिथीची गरज आहे.

# व्रतादिकांविषयीं तिथि कशी असावी त्याचा निर्णय.

ज्या कर्माला जो काल असेल त्या कालास व्यापणारी तिथि घ्यावी. ज्या प्रमाणें विनायकादिक व्रताचे ठिकाणीं मध्यान्हकालीं पूजनादि विधी सांगितला आहे, या करितां मध्यान्हकालव्यापिनी तिथि घ्यावी. दोनही दिवसीं कर्मकालास व्यापणारी किंवा न व्यापणारी अशी एकदेशव्याप्ति तिथि असेल तर युग्मवाक्यादिकें करून पूर्वविद्धा किंवा परविद्धा तिथि घ्यावी. हें युग्मवाक्य— "युग्माग्नियुगभूतानांषण्मुन्योर्वसुरंध्रयोः॥ रुद्रेणद्वादशीयुक्ताचतुर्दश्याचपूर्णिमा ॥प्रतिपदाप्यमावास्यातिथ्योर्युग्मंमहाफलं॥" द्वितीया तृतीयाविद्धा घ्यावी; तृतीया द्वितीयाविद्धा घ्यावी; या प्रकारें करून द्वितीया व तृतीया यांचें युग्म. चतुर्थी पंचमीचें युग्म; षष्ठी सप्तमीचें युग्म; अष्टमी नवमीचें युग्म; एकादशी द्वादशीचें युग्म; चतुर्दशी पौर्णिमेचें युग्म; अमावास्या प्रतिपदेचें युग्म; या प्रकारें करून जाणावीं. क्वचित् प्रसंगीं "गणपतीच्या व्रताविषयीं चतुर्थी मातृविद्धा प्रशस्त होय" इत्यादि विशेष वचनांचे योगानें ग्राह्यत्वाचा निर्णय करावा. वचनें करून जी तिथि कर्मकालास ग्राह्य नसेल ती साकल्यवचनें करून ग्राह्य मानावी. तीं वचनें—"ज्या तिथीचे ठायीं सूर्योदय होतो, ती तिथि स्नान, दान, जप इत्यादिकां विषयीं संपूर्ण जाणावी. ॥ या प्रकारें करून सामान्य निर्णयाविषयीं हा चवथा उद्देश झाला. ॥

# कर्मविशेषाचा निर्णय:

कर्मे दोन प्रकारचीं. दैव कर्म व पित्र्य कर्म. दैवकर्मे सहा प्रकारचीं. तीं अशीं,

एकभुक्त, नक्त, अयाचित, उपवास, आणि दान. मध्यान्ह काळीं एकवेळ एका प्रकारच्याच अन्नाचें भोजन करणें हें एकभुक्त. रात्रीचे प्रदोष काळाचे ठायीं भोजन करणें हें नक्त. याचना केल्यावांचून त्या दीवशींच मिळालेल्या अन्नाचें भोजन करणें हें अयाचित. स्त्रीपुत्रादिकांजवळ याचना केल्या वांचून अन्य दिवशीं मिळालेल्या अन्नाचें ही भोजन करणें हें अयाचित होय, असें कित्येकांचें मत आहे. अहोरात्रीमध्यें भोजन न करणें हे उपोषण. पूजादिक कर्मांचा जो विशेष प्रकार तें व्रत. आपलें स्वामित्व दूर करून दुसऱ्याची सत्ता स्थापीत करून कोणतीही वस्तु देणें हें दान. हीं एकभुक्तादिक व्रतें क्वचित् व्रतादिकांच्या अंगभूत सांगितलीं, क्वचित् एकादशी आदीकरून जीं उपोषणें त्यांच्या प्रतिनिधि रूपानें सांगितलीं आणि क्वचित् स्वतंत्र, या प्रकारें करून तीन प्रकारचीं सांगितलीं. त्यांमध्यें अंगभूत व प्रतिनिधिभूत व्रतांचा निर्णय त्या त्या मुख्य व्रतांच्या निर्णया प्रमाणें जाणावा.

## स्वतंत्रव्रतांचा निर्णय

आतां दिवसाचे पांच भाग करून त्यांपैकीं. प्रथम भागाला प्रातःकाल असें ह्मणतात. दुसरा संगवकाल, तिसरा मध्यान्ह, चवथा अपराण्ह, आणि पांचवा सायान्हकाल. सूर्य अस्ता नंतर तीन मुहूर्त पर्यंत प्रदोषकाल, त्यामध्यें एकभुक्त व्रता करितां तिथि घेणें ती मध्यान्हकालव्यापिनी घ्यावी. त्यामध्येंही अर्धा दिवस जाऊन तीस घटिकांचे मध्यम दिनमानानें सोळा, सत्रा व आठरा या तिन घटिका मुख्य भोजन-काल होय. त्यानंतर संध्याकालपर्यंत गौण काल जाणावा. पूर्व दिवशींच मुख्यकाळीं व्याप्ति, दुसऱ्या दिवशींच व्याप्ति, दोनही दिवसीं व्याप्ति, दोनही दिवसीं व्याप्ति नाहीं, दोनही दिवसीं सारखी एकदेश व्याप्ति, आणि कमीजास्तमानानें एकदेशव्याप्ति. याप्रमाणे तिथीच्या व्याप्तीविषयीं सहा प्रकार आहेत. त्यांमध्यें अदल्या दिवसींच मुख्यकालाचे ठाईं ग्राह्य तिथि असतां पूर्वींचीच घ्यावी. दुसऱ्या दिवसींच ग्राह्य असल्यास निःसंशय दुसरीच घ्यावी. दोनही दिवसीं पूर्णव्यापिनी असतां युग्मवाक्यानें निर्णय करावा. दोन ही दिवसीं व्याप्ति नसेल तर गौणकालीं व्याप्ति आहे याकरितां पूर्वींचीच घ्यावी. सारखी एकदेशव्याप्ति असतां पूर्वींचीच. कमीजास्त मानाने एकदेशव्याप्ति असून दोनही दिवसीं कर्माचीसमाप्ती होई पर्यंत असल्यास युग्मवाक्यानें निर्णय करावा. कर्माचीसमाप्ति होई पर्यंत तिथि लाभत नसल्यास पूर्वींचीच घ्यावी. या प्रकारें करून एक भुक्ताचा निर्णय झाला.

## नक्तव्रताचा निर्णय.

सूर्यास्ता नंतर सहा घटिका प्रदोषकालव्यापिनी तिथि नक्त व्रताविषयीं घ्यावी. दोन दिवसांतून कोणत्याही एक दिवसीं ती व्याप्ति असेल किंवा प्रदोषकालीं एकदेश व्याप्ति असेल तर तीच घ्यावी. भोजन करणें तें सूर्यास्तानंतर तीन घटिका संध्याकाळ

टाकून करावें. संध्याकाळीं भोजन, निद्रा, मैथुन आणि अध्ययन हीं वर्ज्य आहेत. संन्यासी, पुत्ररहित, ज्याची पत्नी मृत झाली असेल तो, आणि विधवा, यांणीं 'रात्रीं भोजन करूं नये.' असा निषेध आहे, या करितां सायान्हकालव्यापिनी तिथि असतां दिवसाचे आठव्या भागीं नक्त करावें. याच प्रमाणें सूर्य संबंधी नक्त करणें तेंही सायंकालव्यापिनी तिथि असतां दिवसासच करावें. दोन दिवस प्रदोषव्यापिनी असल्यास दुसऱ्या दिवसाची तिथि घ्यावी. दोन दिवसीं प्रदोषव्याप्ति नसेल तर दुसऱ्या दिवसींच संध्याकाळीं दिवसाच्या आठव्या भागामध्यें नक्त करावें. रात्रीं करूं नये. दोनही दिवसीं एकसारखी एकदेशव्याप्ति असल्यास दुसऱ्या दिवसाचीच तिथि घ्यावी. दोन दिवसीं प्रदोष कालीं विषम मानानें एकदेशव्याप्ति असून या प्रसंगीं पूजा व भोजन होण्या सारखी अधिक तिथि मिळाल्यास ती अधिकव्यापिनी पूर्व दिवसींचीही घ्यावी. पूजा व भोजन होईल इतकी अधिक न मिळाल्यास साम्यपक्षा प्रमाणें दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. अधिकव्याप्ति आहे ह्मणून पूर्वींची घेऊं नये. नक्त व्रताचे संबंधानें भोजन करणें तें विधिप्राप्त असल्यामुळें रविवार, संक्रांति, इत्यादिकांचे ठायींही रात्रीं भोजन करावें. रविवारादिकांचे दिवसीं रात्रौ भोजनाचा जो निषेध आहे तो प्रीतिप्राप्त भोजनाचे संबंधानें आहे. एकादशी इत्यादिकांचे उपवासा ऐवजीं भोजन करावयाचें तें उपवासाच्या निर्णीत दिवसींच करावें. अयाचित व्रत अहोरात्र साध्य असल्यामुळें उपोषणा प्रमाणेंच त्याचा निर्णय जाणावा. अपराण्हादिव्यापिनी तिथि घेण्याविषयीं पित्र्यकर्मांचा निर्णय त्या त्या प्रसंगीं सांगण्यांत येईल. एकभुक्त, नक्त, अयाचित आणि उपोषण, हीं पाहिल्या तिथीचे ठायीं केलीं असल्यास दुसऱ्या दिवसीं त्या तिथीचे अंतीं पारणा करावी. तीन प्रहरांहून अधिक तिथि असल्यास सर्वत्र प्रातःकाळीं पारणा होय, याप्रमाणें **माधव** ह्मणतात. ॥ या प्रकारें करून एकभुक्तादि निर्णय जाणावा. उद्देश पांचवा. ॥

# आतां व्रताची परिभाषा.

स्त्रिया व शूद्र यांना दोन दिवसांहून जास्त उपोषण करण्यास अधिकार नाहीं. स्त्रियांना तर पतीच्या आज्ञेवांचून व्रतें व उपोषणें इत्यादिक करण्याला अधिकार नाहीं. उपोषणाचे दिवसीं आणि श्राद्धदिवसीं काष्टानें दांत घांसूं नयेत. पानादिकानें किंवा बारा चूळ भरून दांत धुवावे. पाण्यानें भरलेलें तांब्याचें भांडें हातांत घेऊन उत्तर दिशेस तोंड करून उपोषणादिक व्रताचा संकल्प करावा. नव्या व्रताचा आरंभ व उद्यापन हीं, मलमास; गुरुशुक्राचें अस्त; वैधृति, व्यतीपात इत्यादि कुयोग; कल्याणी; क्रूरवार व निषिद्ध अशी अमावास्यादि तिथि यांचे ठायीं होत

नाहींत. मत्स्यव्रताचें वचन असें आहे कीं, " सूर्योदयकालीं तिथि असून ती दोन प्रहर पर्यंत नसेल तर ती खंडा तिथि, तिचे ठायीं व्रताचा आरंभ व समाप्ति करूं नये." या करितां खंडा तिथीलाही व्रताचा आरंभ व समाप्ति करूं नये. क्षमा, सत्यभाषण, दया, दान, स्वच्छता, इंद्रियनिग्रह, देवपूजा, होम, संतोष, व चोरी न करणें, हे धर्म सर्व व्रतांचे ठिकाणीं जाणावे. येथें व्याहृतिमंत्रें करून होम करावा. काम्यव्रताचा इतकाच विशेष जाणावा. ज्या देवतेचें उपोषणव्रत असेल त्या देवतेचा जप, ध्यान, कथाश्रवण, पूजा, तिच्या नामाचें श्रवणकीर्तन, इत्यादिक करावीं. उपोषणाचे दिवशीं अन्न पाहणें, अन्नाचा वास घेणें, तैलाभ्यंग, तांबूल, अंगाला उटी देणें, हीं वर्ज्य करावीं. सौभाग्यवती स्त्रियांला सौभाग्यव्रताचे ठायीं तैलाभ्यंग, तांबूल, इत्यादिक वर्ज्य नाहींत. उदक, मूल, फल, दूध, हविष्य, ब्राह्मणाची इच्छा, गुरूचें वचन, औषध, हीं आठ व्रतघ्न नाहींत. विस्मरणादिकानें व्रतभंग झाला असतां तीन दिवस उपोषण व क्षौर करून पुनः व्रत करावें. उपवासाविषयीं अशक्त असल्यास त्याजबद्दल एक ब्राह्मणास भोजन, अथवा तितकें द्रव्यदान, सहस्र गायत्री जप, किंवा बारा प्राणायाम हें प्रायश्चित्त करावें. पूर्वी घेतलेलें व्रत करण्याविषयीं अशक्त असेल त्यानें तें प्रतिनिधिद्वारा करावें. पुत्र, स्त्री, पति, उपाध्याय, मित्र हे प्रतिनिधि जाणावे. पुत्रादिकांनीं पिता इत्यादिकांचे उद्देशानें व्रत केलें असतां त्या व्रताचें फल स्वतः त्या कर्त्यालाही मिळतें. वारंवार उदक पिणें, एकवार तांबूल भक्षण करणें, दिवसा निद्रा व मैथुन करणें, याचे योगानें उपोषणाचा नाश होतो. स्त्रियेचें स्मरण करणें, विषयाच्या गोष्टी सांगणें, क्रीडा करणें, कटाक्षांनीं पाहणें, एकांतस्थानीं गुप्त गोष्टी करणें, अमुक प्रकारें मी विषयांचा उपभोग करीन असा संकल्प करणें, अमुक विषयाचा मी उपभोग करीन असा निश्चयकरणें, आणि प्रत्यक्ष मैथुनकरणें, अशा आठ प्रकारच्या मैथुनांतून कोणतेंही आचरण करूं नये. प्राणसंकट आलें असतां तशावेळीं वारंवार उदक प्राशन केलें असतां दोष नाहीं. पखाली वगैरे चामड्याच्या पात्रांतील उदक, गाईखेरीज दुसरे कोणाचें दूध, मसुरा, ईडनिंबू व शिंपीचा चुना, यांना **आमिषगण** असें ह्मणतात. हे व्रताच्या ठिकाणीं वर्ज्य करावे. अश्रुपात होणे ( रडणे ),क्रोध, इत्यादिकांचे योगानें व्रताचा तात्काल नाश होतो. व्रत केलें असून दुसऱ्याचे घरीं भोजन केलें असतां ज्याचें अन्न खावें त्याला त्या व्रताचें फळ मिळतें. तीळ, मूग, यावांचून शेंगेंत उत्पन्न होणारीं हरभरे वगैरे धान्यें, उडीद, मुळा, इत्यादिक, याला **क्षारगण** ह्मणतात. हे पदार्थ व तशींच लवण, मध, मांसादिक हीं व्रताचे दिवसीं वर्ज्य करावीं. सांवे, देवभात, गहूं हे व्रताला शुद्ध आहेत. साळीचे तांदुळ, जव मूग, तीळ, राळे,

वाटाणे, वगैरे धान्यें; पांढरामुळा, सुरण, इत्यादि कंद; सैंधव व समुद्रापासून उत्पन्न होणारीं असीं लवणें; गाईचें दहीं, दूध व तूप, फणस, आंबा, नारळ, हरीतकी पिंपळी, जिरें, सुंठ, चिंच, केळें, रायआंवळे, आंवळे, साखर; हीं सर्व अतैलपक हविष्यें होत. गायीचें ताक व म्हशीचें तूप, हीं हविष्यें, असेंही कोणी म्हणतात. ज्या ठिकाणीं व्रताचा विधि सांगितला नाहीं तेथें पांच गुंजा सोन्याची किंवा रुप्याची प्रतिमा करून पूजा करावी. द्रव्य सांगितलें नसेल तर तुपाचा होम करावा. देवता सांगितली नसेल तर प्रजापति देवता घ्यावी. मंत्र सांगितला नसल्यास व्याहृतिमंत्र योजावा. ज्या ठिकाणीं होमाची संख्या सांगितली नसेल तेथें एकशेंआठ, अठ्ठावीस, किंवा आठ, यांतून एक संख्या घ्यावी. उपोषण केल्यास व्रताचे सांगते करितां ब्राह्मणभोजन करावें. ज्या व्रताचें उद्यापन सांगितलें नाहीं त्याजबद्दल गोप्रदान किंवा सुवर्णदान करावें. किंवा ब्राह्मणाच्या वचनानेंही व्रताची सांगता होते. परंतु सर्वत्र ठिकाणीं ब्राह्मणाचें वचन त्याला दक्षिणा देऊन घ्यावें. ग्रहण केलेल्या व्रताचा त्याग केला असतां चांडाला प्रमाणें दोषी होतो. विधवा स्त्रियांनीं व्रतादिकांचे दिवसीं चित्रविचित्र रंगांचीं व तांबडीं वस्त्रें धारण करूं नयेत. पांढरींच धारण करावीं. स्त्रियांना सुतक, रजस्वलादोष, ज्वरादिकरोग, इत्यादि प्राप्त झालीं असतां उपोषणादिक शरीर संबंधीं नियम स्वत: करावे, आणि पूजा इत्यादिक दुसऱ्या कडून करवावें. पूर्वीं आरंभिलेलें नाहीं, असें व्रत सुतकादिकांत करूं नये. काम्यकर्माचे ठिकाणीं प्रतिनिधि चालत नाहीं. नित्य आणि नैमित्तिककर्मे यांचे ठिकाणीं प्रतिनिधि चालतो. आरंभ झाल्या नंतर काम्यकर्माचे ठिकाणींही प्रतिनिधि चालतो असें कोणी ग्रंथकार म्हणतात. मंत्र, यजमान, देवता, व अग्निकार्य, यांचे ठिकाणीं प्रतिनिधि चालत नाहीं कोणत्याही प्रसंगीं निषिद्ध पदार्थ प्रतिनिधिस्थानीं योजूं नये. एकाच वेळीं अनेक व्रतादि प्राप्त झालीं असतां विरुद्ध नाहींत असीं दान, होमादिक अनुक्रमानें करावीं. परस्पर विरुद्ध अशीं नक्तभोजन, उपोषणादिक असतील तर त्यां पैकीं एक आपण करून दुसरीं पुत्र, स्त्री इत्यादिकांकडून करवावीं.

जेथें चतुर्थी, अष्टमी इत्यादि दिवसीं दिवसा भोजन करण्याचा निषेध असून त्याच दिवसीं दुसऱ्या व्रताची पारणा प्राप्त झाली, तर तशा प्रसंगीं, पारणा विधिप्राप्त आहे यास्तव भोजनच करावें. वरील भोजनाचा निषेध सांगितला तो प्रीतिप्राप्त भोजनाविषयीं आहे. याप्रमाणें रविवारादि दिवसीं संकष्टचतुर्थ्यादि व्रत प्राप्त झालें असतां रात्रींच भोजन करावें. जेथें अष्टम्यादिकांचे ठायीं दिवसा भोजनाचा निषेध व रात्रीं रविवार प्रयुक्त भोजनाचा निषेध सांगितला तेथें प्राप्त असें उपोषणच करावें. आणि ज्या ठिकाणीं

पुत्रवान् अशा गृहस्थाश्रमीला संक्रांति इत्यादि उपवासाचाही निषेध सांगितला असून त्यादिवशीं चतुर्दशी निमित्तक किंवा अष्टमीनिमित्तक दिवसा भोजनाचा निषेध प्राप्त झाला तर त्या ठिकाणीं कांहीं अल्प उपहार करून उपवासच करावा. चांद्रायण व्रतामध्यें एकादश्यादि उपोषणव्रत प्राप्त झालें असतां ग्राससंख्येच्या नियमानें भोजनच करावें. याप्रमाणे कृच्छ्रादि व्रतांविषयींही जाणावें. याप्रमाणें एकादशीचे दिवशीं एकादिवसाआड ( एकांत्राड )करावयाचे व्रतांची पारणा आलीअसतां उदकानें पारणा करून उपोषण करावें. याप्रमाणें द्वादशीचे दिवशीं मासोपवास व्रत, श्राद्ध, आणि प्रदोषव्रतसंबंधी पारणा प्राप्त होईल तर उदकानें पारणा करून उपोषण करावें. एकादशी इत्यादिकांचे ठायीं संक्रांत आली असतां पुत्रवान् गृहस्थाश्रमी यांनीं उपोषण न करितां उदक, मूळें, फळें, दूध, यां पैकीं कांहीं भक्षण करावें. एक दिवशीं दोन उपोषणें, दोन नक्तें, किंवा दोन एकभुक्तें प्राप्त होतील तर " अमुक उपवास व अमुक उपवास असीं दोन, तंत्रानें करितों " याप्रमाणें संकल्प करून एकतंत्रानें उपवास, पूजा व होम यांचें आचरण करावें. एक दिवशीं उपवास व एकभुक्त असीं दोन व्रतें प्राप्त होऊन त्या दिवशीं द्विधातिथि येईल तर गौणकालव्याप्ति घेऊन त्यां पैकीं एक पूर्वीच्या तिथीला व दुसरें बाकी राहिलेल्या तिथीला या प्रमाणें करावीं. अखंडा तिथीचे ठिकाणीं एक पुत्रादिकांकडून करवावें असें सांगितलें. या प्रकारें करून काम्यकर्म नित्यकर्माचें बाधक होतें इत्यादिक जीं वचनें त्यांचे योगानें काम्य, नित्य, प्रबल, दुर्बल, बाध, अबाध, संभव, असंभव इत्यादि विचार करून करणें तें करावें. ॥ या प्रकारें करून सामान्यव्रतपरिभाषा झाली. उद्देश सहावा. ॥

# प्रतिपदादि तिथींचा निर्णय.

(प्रतिपदा. )

शुक्ल पक्षांतील प्रतिपदा पूजा, व्रतादिकांविषयीं घेणें ती अपराण्हकालव्यापिनी असून पूर्व तिथीनें विद्ध असेल ती घ्यावी. सायान्हकालव्याप्ति असतांही पूर्वीचीच घ्यावी, असें माधवाचार्य ह्मणतात. तसें नसेल तर द्वितीयेनें युक्त असेल ती घ्यावी. कृष्ण पक्षांतील कोणतीही प्रतिपदा द्वितीयेनें युक्त असेल तीच घ्यावी. उपवासाविषयीं घ्यावयाची असेल तर, शुक्ल व कृष्ण दोनही पक्षांचे ठिकाणीं पूर्व तिथीनें विद्ध असेल तीच प्रतिपदा घ्यावी. अपराण्हकालव्यापिनी जी प्रतिपदा तिचे ठायीं करावयाचें जें उपवासादि व्रत त्याचा संकल्प प्रातःकाळींच करावा; संकल्पाचे वेळीं प्रतिपदादि तिथि नसली तथापि तेवेळीं प्रतिपदादि तिथीचा उच्चार करावा. अमावास्यादिक तिथीचा करूं नये. या प्रकारें करून शुद्ध द्वादशी उपोषणास योग्य, इत्यादिक स्थळीं एकादशी:

व्रतसंबंधी संकल्प, पूजादिक करणे, त्या प्रसंगीं एकादशीचाच उच्चार करावा. द्वादशीचा करूंनये. संध्या अग्निहोत्र, इत्यादि जीं दुसरीं कर्मे त्यांचा संकल्प करतेवेळीं त्या त्या कालाला व्यापणारी अशी द्वादशी इत्यादिकच उच्चारावी, असें मला वाटतें. संकल्प करणें तो सूर्योदयापूर्वी उषःकाली करावा. किंवा सूर्योदयानंतर तीन मुहूर्त पर्यंत जो प्रातःकाळ त्यामध्यें दोन मुहूर्तांच्या आंत करावा. तिसरा मुहूर्त निषिद्ध आहे. ॥ याप्रमाणे प्रतिपदेचा निर्णय झाला. उद्देश सातवा.॥

## द्वितीयेचा निर्णय.

शुक्लपक्षांतील द्वितीया परविद्धा घ्यावी. कृष्णपक्षामध्यें, दिवसाचे दोन भाग करून पूर्वभागामध्यें प्रविष्ट असेल तर पूर्वीची घ्यावी. तशी नसेल तर कृष्णपक्षांतील द्वितीयाही परविद्धाच घ्यावी. ॥ या प्रकारें करून द्वितीयेचा निर्णय झाला. उद्देश आठवा. ॥

## तृतीयेचा निर्णय.

रंभाव्रताविषयीं तृतीया पूर्वविद्धा घ्यावी. रंभाव्रतावांचून दुसऱ्या व्रताविषयीं साहा घटिका द्वितीयेनें विद्ध झालेली अशी पूर्वीची टाकून दुसऱ्या दिवसीं साहा घटिका व्याप्ति असेल ती घ्यावी. पूर्व दिवसीं द्वितीयेचा वेध साहा घटिकांहून कमी असेल आणि दुसऱ्या दिवसीं साहा घटिकांहून कमी व्याप्ति असेल तर पूर्वीचीच घ्यावी. पूर्व दिवसीं साहा घटिका द्वितीयेचा वेध असून दुसऱ्या दिवसीं साहा घटिकांहून कमी असली तथापि ती कमीहि घ्यावी. गौरीव्रताविषयीं कलाकाष्ठादिपरिमित अल्पद्वितीयायुक्तही निषिद्ध होय. दुसऱ्या दिवसीं स्वल्प असली तथापि तीच तृतीया घ्यावी. ज्या वेळीं दिनक्षयानें दुसऱ्या दिवसीं चतुर्थीनें युक्त अशी अल्पही तृतीया नसेल आणि पूर्व दिवसीं द्वितीयेनें विद्ध असेल तर द्वितीयेनें विद्ध अशी तीच घ्यावी. जेव्हां दिनवृद्धीनें पूर्वदिवसीं साठ घटिका तृतीया असेल आणि दुसऱ्या दिवसीं शेष उरलेली एक दोन घटिका असेल तेव्हां पूर्वीची शुद्ध अशी साठ घटिका तृतीया टाकून चतुर्थीयुक्त असेल तीच गौरीव्रताकरितां घ्यावी. ॥ याप्रमाणें तृतीयेचा निर्णय झाला. उद्देश नववा. ॥

## चतुर्थीचा निर्णय.

गणेशव्रताखेरीज दुसऱ्या व्रताविषयीं पचमीयुक्त चतुर्थी घ्यावी. गौरीव्रत आणि विनायकव्रत यांविषयीं मध्यान्हकालव्यापिनी घ्यावी. दुसऱ्या दिवसींच मध्यान्हकालव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन दिवसीं मध्यान्हकालव्यापिनी

असल्यास, किंवा दोनही दिवशीं मध्यान्हकालव्यापिनी नसल्यास, अथवा दो: दिवशीं सारखी किंवा कमी जास्ती एकदेशव्याप्ति असेल, तर पूर्व दिवशीं तृत योग आहे व तो प्रशस्त आहे, या करितां पूर्वीचीच घ्यावी. नागव्रताविषयीं : ती पूर्वदिवसींच मध्यान्हकालव्यापिनी असल्यास तीच घ्यावी. दोन दिवशीं मध न्हकालव्यापिनी असेल, किंवा दोनही दिवशीं मध्यान्हकालव्यापिनी नसेल, किं दोनही दिवशीं सारखी किंवा कमी जास्ती एकदेशव्याप्ति असेल तर पंच युक्तच घ्यावी. संकष्टचतुर्थी तर चंद्रोदयव्यापिनी घ्यावी. दुसऱ्या दिवशीं चं दयास पोंचली असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोन दिवशीं चंद्रोदय पोंचली असेल तर तृतीयायुक्तच घ्यावी. दोन दिवस चंद्रोदयव्याप्ति नसेल दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. ॥ या प्रकारें करून चतुर्थीचा निर्णय झाला. उद्दे दाहावा. ॥

# पंचमीचा निर्णय.

शुक्ल पक्षांतील व कृष्ण पक्षांतील पंचमी कोणत्याही कर्मांविषयीं घ्यावयाची : चतुर्थीनें विद्ध असेल ती घ्यावी. स्कंद व्रताविषयीं पंचमी घेणें ती मात्र षष्ठियुक्त घ्याव नागव्रताविषयीं पंचमी षष्ठीनें विद्ध असेल ती घ्यावी. दुसऱ्या दिवशीं साहा घटिकांपे कमी पंचमी असून पूर्व दिवशीं साहा घटिकांहून कमी अशा चतुर्थीनें विद्ध असेल त चतुर्थीविद्ध असेल ती घ्यावी. चतुर्थीचा वेध सहा घटिकां पेक्षां अधिक असेल, दुसऱ्या दिवशीं चार घटिका पंचमी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. ॥ य प्रकारें करून पंचमीचा निर्णय झाला. उद्देश ११ ॥

# षष्ठीचा निर्णय.

स्कंदव्रताविषयीं पूर्वविद्धा षष्ठी घ्यावी. दुसऱ्या व्रतांविषयीं परविद्धा घ्यावी. पू दिवशीं बारा घटिकांहून कमी पंचमीचा वेध असतां पूर्व दिवसाचीही घ्यावी. ष आणि सप्तमी या दिवशीं रविवाराचा योग आला असतां त्याला पद्मकयोग म्ह तात. ॥ या प्रकारें करून षष्ठीचा निर्णय झाला. उद्देश १२ ॥

# सप्तमीचानिर्णय.

कोणत्याही कर्माला षष्ठियुक्त अशी सप्तमी घ्यावी. ज्यावेळीं पूर्व दिवशीं सूर्यास्त पर्यंत षष्ठी असून दिवसास षष्ठीनें विद्ध असी सप्तमी लाभत नसेल तर दुसऱ्या दिवशीं अष्टमीविद्धा असेल ती दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. या प्रमाणें दुसऱ्या तिथींच्या निर्णय विषयींही जाणावें. ॥ याप्रमाणें सप्तमीचा निर्णय जाणावा. उद्देश १३ ॥

# अष्टमीचा निर्णय.

व्रतमात्राविषयीं शुक्लपक्षांतील अष्टमी दुसऱ्या दिवसाची घ्यावी. कृष्णपक्षांतील पूर्वीची घ्यावी. मिश्रित अशा शिवशक्तीच्या उत्सवाविषयीं कृष्णपक्षांतीलही दुसरीच घ्यावी. शुक्लपक्षांतील बुधाष्टमी प्रातःकालापासून अपराण्हपर्यंत ज्यादिवशीं दोन घटिकाहि बुधवारयोग असेल ती घ्यावी; सायान्हकालीं, चैत्रमहिन्यांत, श्रावणादि चार महिन्यांमध्यें व कृष्णपक्षाचे ठायीं घेऊं नये. कोणी कृष्णपक्षांतील सर्व अष्टमीचे ठायीं कालभैरवाच्या निमित्तानें उपोषण करितात; त्याप्रसंगीं, मार्गशीर्ष कृष्णपक्षांतील अष्टमीचेठायीं भैरवजयंती असल्यामुळें त्यादिवसाच्या निर्णयावरून मध्यान्हकालव्यापिनी घ्यावी. दोनदिवशीं मध्यान्हकालव्यापिनी असल्यास पूर्वीचीच घ्यावी. कौस्तुभामध्यें प्रदोषकालव्यापिनी घ्यावी असें सांगितलें आहे, याकरितां दोनदिवस प्रदोषकालव्यापिनी असल्यास, दोनाहि प्रकारचे वाक्यांचा परस्पर विरोध नसल्यामुळे दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. पूर्वदिवशींच प्रदोषकालव्याप्ति असेल आणि दुसऱ्यादिवशीं मध्यान्हकालीं व्याप्ति असेल तर बहुशिष्टाचाराच्या अनुरोधानें प्रदोषकालव्यापिनी पूर्वीचीच घ्यावी. जेथें "रविवार, अमावास्या आणि पौर्णिमा यांचेठायीं रात्रीं भोजनाचा निषेध, व चतुर्दशी आणि अष्टमी या दिवशीं दिवसा भोजनाचा निषेध" या वचनानें दिवसा भोजनाचा निषेध मात्र पाळण्याविषयीं सांगितलें असून किंचितही व्रत सांगितलें नाहीं. या ठिकाणीं "निषेध तर निवृत्तिरूप असून कालमात्राची अपेक्षा करितो" या वचनानें भोजनकालव्यापिनी अष्टमी टाकून नवमींत किंवा सप्तमींत भोजन करावें असें मला वाटतें. युक्तायुक्ताचा विचार विद्वानांनीं करावा. ॥ याप्रकारें करून अष्टमीचा निर्णय झाला. उद्देश १४ ॥

# नवमीचा निर्णय.

सर्वत्र ठिकाणीं नवमी अष्टमीनें विद्ध असेल तीच घ्यावी. ॥ याप्रकारें करून नवमीचा निर्णय झाला. उद्देश १५ ॥

# दशमीचा निर्णय.

दशमीतर उपोषणादिकांविषयीं नवमीयुक्तच घ्यावी. पूर्वविद्धा ह्मणजे नवमीयुक्त लाभत नसल्यास परविद्धा ह्मणजे एकादशीनेंयुक्त असेल ती घ्यावी. ॥ याप्रकारेंकरून दशमीचा निर्णय झाला. उद्देश १६ ॥

# एकादशीचा निर्णय.

एकादशीचें उपोषण दोन प्रकारचें आहे. एक भोजनाविषयींचा निषेध पाळणें,

व दुसरें व्रतात्मक उपोषण करणें. पहिल्याविषयीं पुत्रवान् गृहस्थाश्रमी इत्यादिकांना कृष्णपक्षामध्येही अधिकार आहे. व्रतात्मक उपोषण तर पुत्रवान् अशा गृहस्थाश्रमींनीं कृष्णपक्षाचे ठायीं करूं नये; तर मंत्रसहित संकल्प न करितां यथाशक्ति नियमधारणानें भोजन मात्र वर्ज्य करावें. या प्रमाणे तिथीचा क्षय असतां शुक्लपक्षांतील एकादशीविषयीं ही जाणावें. **शयनी** आणि **बोधिनि** यांजमधलि कृष्णपक्षाचे एकादशी विषयीं पुत्रवान् गृहस्थाश्रमींना सर्व प्रकारचा अधिकार आहे. विष्णूची सायुज्यता इच्छिणारे व आयुष्य, पुत्र यांतें इच्छिणारे, यांनीं काम्यव्रत दोनही पक्षांमध्यें करावें. त्याजविषयीं कोणताही निषेध नाहीं. वैष्णव व गृहस्थाश्रमी यांनीं कृष्ण एकादशीचे ठायीं नित्य उपोषण करावें. हें एकादशीव्रत शैव, वैष्णव, आणि सूर्याची उपासना करणारे जे सौरादिक त्या सर्वांना नित्य आहे. कारण तें न केलें असतां दोष सांगितला. तसेंच या पासून संपत्त्यादि फलप्राप्ति होते यास्तव ते **काम्यहि** होय. कितीएक ग्रंथकारांचे असें ह्मणणें आहे कीं, दोन घटिकादि परिमित दशमी असल्यास दशमींतच भोजन करावें. व सूर्योदयाच्या पूर्वींच प्राप्त असो जी शुद्धाधिकाधिकद्वादशी तिचे ठायीं तर एकसारखीं दोन उपोषणें करावीं. या प्रमाणें तिथिपालनहि सांगतात, परंतु ते युक्त नाहीं. आठ वर्षांनंतर ८० वर्षेंपर्यंत एकादशीव्रताचा अधिकार आहे. शक्तिमान् असेल त्याला ८० वर्षांनंतरहि अधिकार आहे. सौभाग्यवती स्त्रियांनीं पतीच्या किंवा पिता इत्यादिकांच्या आज्ञेवांचून उपवास, व्रतादिक आचरण केलीं असतां तें व्रत व्यर्थ होऊन पतीच्या आयुष्याचा क्षय व नरकप्राप्ति होते! अशक्त असतील त्यांनीं नक्त, हविष्यान्न, अनोदन, फल, तिल, दूध, उदक, तूप, पंचगव्य, वायू, हीं एकाहून दुसरें श्रेष्ठ या मानानें प्रशस्त आहेत; या करितां आपले शक्तितारतम्यानें यांतून कोणत्या तरी एका पक्षाचा स्वीकार करावा, परंतु एकादशीचा त्याग करूं नये. विस्मरणानें एकादशीचे दिवसीं उपोषण न केल्यास द्वादशीचे दिवसींहि व्रत करावें. द्वादशीचेहि दिवसीं न केलें तर **यवमध्यचांद्रायण** करावें. नास्तिकपणानें न केल्यास **पिपीलिकामध्यचांद्रायण** करावें. पति, पिता इत्यादिक व्रत करण्यास अशक्त असतां त्यांच्या उद्देशेंकरून स्त्री, पुत्र, भगिनी, भ्राता, इत्यादिकांनीं एकादशीव्रत आचरण केल्यास शंभर यज्ञांचें पुण्य लागतें.

## आतां व्रतदिवसाचा निर्णय.

या व्रताचे अधिकारी दोन प्रकारचे आहेत. **वैष्णव** आणि **स्मार्त** त्यामध्यें ज्यांला वैष्णवी दीक्षा आहे इत्यादि लक्षणांनीं युक्त ते वैष्णव, व त्यांहून निराळे ते स्मार्त. या प्रकारे करून मोठाल्या ग्रंथांत सांगितलें आहे, तथापि परंपरागत प्रसिद्ध चालउ

आलेले जे वैष्णव व स्मार्त धर्म, तेच वृद्ध मानितात, असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे त्याप्रमाणेंच सर्व देशांत संपूर्णशिष्टांनीं ग्रहण केलेला असा विचार चालतो. वेधहि दोन प्रकारचा आहे. अरुणोदयीं दशमीवेध व सूर्योदयाचे ठायीं दशमीवेध. सूर्योदयाच्या पूर्वींच्या चार घटिका तो अरुणोदय. सूर्योदय तर उघड आहे. त्यामध्ये ५६ घटिका नंतर एक पळमात्र दशमीचा प्रवेश झाला असेल तर तो अरुणोदयवेध. तो वैष्णवांविषयीं घ्यावा. साठ घटिकांनीं सूर्योदय झाल्यानंतर एक पळमात्र दशमी असेल तर तो सूर्योदयवेध. हा स्मार्तांविषयीं घ्यावा. ज्योतिषशास्त्रवेत्त्यादिकांच्या वादानें वेधादिकां विषयीं संदेह उत्पन्न होईल तर किंवा अनेक वाक्यांच्या विरोधानें ब्राह्मणांमध्यें वाद उत्पन्न होईल तर एकादशी टाकून द्वादशीचे दिवसीं उपोषण करावें.

# एकादशीचे भेद.

आतां एकादशी दोनप्रकारची आहे. **विद्धा** आणि **शुद्धा.** अरुणोदयवेधवती ती **विद्धा.** ती टाकून वैष्णवांनीं द्वादशीस उपोषण करावें. अरुणोदयवेधरहित ती **शुद्धा.** ती चार प्रकारची आहे—**एकादशीमात्राधिक्यवती, द्वादशीमात्राधिक्यवती, उभयाधिक्यवती, अनुभयाधिक्यवती;** येथें आधिक्य ह्मणजे सूर्योदयानंतर तिथीचें असणें. आतां त्याचीं उदाहरणें.—दशमी घटिका ५५, एकादशी ६०।१ द्वादशीचा क्षय ५८, ही **एकादशीमात्राधिक्यवतीशुद्धा.** यावरून वैष्णवांनीं दुसऱ्या दिवसाची उपोषणास घ्यावी. स्मार्त गृहस्थांनीं पूर्व दिवसींची घ्यावी. दशमी ५५, एकादशी ५८, द्वादशी ६०।१, ही **शुद्धाद्वादशीमात्राधिक्यवती.** याठिकाणीं वैष्णवांनी द्वादशीचेठायीं उपोषण करावें. स्मार्तांनीं पूर्व दिवसींची घ्यावी. आतां दशमी ५५, एकादशी ६०।१, द्वादशी ५, ही **शुद्धाउभयाधिक्यवती,** याठिकाणीं सर्व वैष्णव व स्मार्त यांणीं उपोषणाकरितां पुढचीच घ्यावी. आतां दशमी ५५, एकादशी ५७, द्वादशी ५८, ही **अनुभयाधिक्यवतीशुद्धा.** याठिकाणीं वैष्णव व स्मार्त यांणीं उपोषणाकरितां पूर्वींचीच घ्यावी. ॥ याप्रमाणें संक्षेप करून वैष्णवांचा निर्णय झाला. ॥

# आतां स्मार्तांचा निर्णय.

आतां सूर्योदयवेधरहित ती शुद्धा, व सूर्योदयवेधवती ती विद्धा. याप्रमाणें दोन प्रकारची, त्यापैकीं प्रत्येकाचे चारचार भेद आहेत. **एकादशीमात्राधिक्यवती, उभयाधिक्यवती, द्वादशीमात्राधिक्यवती, अनुभयाधिक्यवती,** याप्रमाणें आठ भेद होतात. याचीं उदाहरणें—दशमी ५८, एकादशी ६०।१, द्वादशीचा क्षय ५८, ही शुद्धाएकादशीमात्राधिक्यवती; दशमी ४; एकादशी २, द्वादशी क्षय ५८, याप्रकारें विद्धा एकादशीमात्रा

धिक्यवती; यादोनही उदाहरणांवरून स्मार्त गृहस्थाश्रमी यांनीं उपोषणा करितां पूर्वीची घ्यावी. संन्यासी, निष्काम गृहस्थाश्रमी, वानप्रस्थ आश्रमांत राहणारे, विधवा, आणि वैष्णव यांनीं पुढचीलाच उपोषण करावें. विष्णूची प्रीति व्हावी असी इच्छा करणारे स्मार्त असतील त्यांनीं दोन उपोषणें करावीं असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. उभयाधिक्यवती शुद्धा ती असी—दशमी ५८, एकादशी ६०।१, द्वादशी ४; उभयाधिक्यवती विद्धा अशा प्रकारची—दशमी२, एकादशी३, द्वादशी४, या दोनही उदाहरणांचे योगानें सर्व स्मार्तांनीं आणि वैष्णवांनीं अवशिष्ट राहिलेली दुसऱ्या दिवसाचीच उपोषणा करितां घ्यावी. द्वादशीमात्राधिक्यवती शुद्धा ती असी —दशमी ५८, एकादशी५९, द्वादशी६०।१, ही शुद्धा असल्यामुळें स्मार्तांनीं एकादशीचे दिवसींच उपोषण करावें, द्वादशीचे दिवसीं करूं नये, असें माधवाचार्यांचें मत आहे हेमाद्रीचें मत तर सर्वांनीं पुढची द्वादशीच उपोषणाला घ्यावी असें आहे. मुमुक्षु स्मार्तांनीं पुढचीलाचउपोषण करावें,असें किती एक ग्रंथकार ह्मणतात.द्वादशीमात्राधिक्यवती विद्धा ती असी–दशमी१,एकादशी क्षयाला पोंचणारी ५८, द्वादशीची वृद्धि ६०।१, या प्रसंगीं एकादशी विद्धा असल्यामुळें स्मार्तांनीं द्वादशीचे दिवसींच उपोषण करावें. त्या प्रमाणेच उभयाधिक्यवती व द्वादशीमात्राधिक्यवती यांचे ठायीं स्मार्तांनीं विद्धेचा त्याग करावा. इतर प्रसंगीं करूं नये. वैष्णवांनीं साहा प्रकारचीहि आधिक्यवती टाकून द्वादशीच उपोषणाकरितां घ्यावी. आतां अनुभयाधिक्यवती सिद्धा, ती असी–दशमी ५७, एकादशी ५८, द्वादशी ५९, या प्रसंगीं स्मार्तांनीं एकादशीचे दिवसींच उपोषण करावें. द्वादशीस करूं नये. ही एकादशी विद्धा असल्यामुळें वैष्णवांनीं द्वादशीचे दिवसीं उपोषण करावें. अनुभयाधिक्यवती विद्धा, ही असी–दशमी२, एकादशीचा क्षय ५६, द्वादशी ५५, या प्रसंगींहि स्मार्तांनीं एकादशीचे दिवसीं उपोषण करावें. वैष्णवांनीं द्वादशीचे दिवसीं उपोषण करावें. या ठिकाणीं अनुभयाधिक्यवती जी विद्धा तिच्या शेवटील भेदाचे प्रसंगीं, पहिल्या दोन भेदां प्रमाणेच संन्यासी, मुमुक्षु आणि विधवा, यांनीं पुढलीलाच उपोषण करावें. विष्णुप्रीति इच्छिणारांनीं दोन उपोषणें करावीं असें तुल्ययुक्तीनें वाटतें. हल्लीं संपूर्ण शिष्ट लोक तर निष्कामव्रत व हेमाद्रीमत यांचा अनादर करून माधव मतानेंच साधारणपणें सर्व स्मार्त निर्णय सांगतात. दोन उपोषणें करावीं, किंवा शुद्धादिक द्वादशीचे दिवसीं सर्वत्रांनीं पुढील एक उपोषण करावें, असें कोठें सांगत नाहींत. या प्रमाणेंच सर्व देशांमध्यें बहुधा माधवांनीं सांगितल्याप्रमाणेंच प्रचार चालत आहे असें जाणावें. या प्रमाणें वैष्णवांचे १८ भेद, आणि स्मार्तांचें १८ भेद या सर्वांचा

निर्णय या उदाहरणांनीं गतार्थ झाला असें समजावें. याहून विशेष विस्तार पाहिजे असल्यास मोठ्या ग्रंथांतून पहावा. याविषयीं अठरा भेदांचीं निरनिराळीं उदाहरणें सांगावीं व त्यांचा निर्णय पृथक् पृथक् सांगावा तर अज्ञांला केवळ भ्रांती मात्र उत्पन्न होईल, यास्तव त्या निर्णयाचा निराळा पट लिहून ठेविला आहे.

# एकादशीचे वेध.

आतां मध्यरात्रीनंतर दशमी असेल तर **कपालवेध**, ५२घटिका दशमी असल्यास **छायावेध**, ५३घटिका असेल तर **ग्रस्तवेध**, ५४घटिका दशमी असेल तर **संपूर्णवेध**, ५५घटिका असल्यास **अतिवेध**, ५६घटिका असेल तर **महावेध**, ५७घटिका असल्यास **प्रलयवेध**, ५८घटिका असेल तर **महाप्रलयवेध**, ५९घटिका असेल तर **घोरवेध**, ६० घटिका असेल तर **राक्षसवेध**, या प्रकारें करून नारदानें वेधाचे भेद सांगितले आहेत. मध्वादिमतास अनुसरणारे जे कोणी आहेत त्यां पैकीं कित्येकच याला अनुसरतात. माध्वाचार्यादिक सर्व संमत असा ५६घटिका वेध ( महावेध )जाणावा. दशमी पंधरा घटिकांनीं एकादशीला दूषित करिते असें जे सांगितलें तें उपवासव्रताविषयीं होय. व्रताचीं अंगभूत जीं संकल्प, पूजादिक, त्यां विषयीं दूषीत एकादशी असली तरी सर्वथा त्यांचा त्याग करूं नये. कां तर प्रातःकालीं करावयाचीं जीं संकल्प, पूजादिक तीं मध्यान्हा नंतर करावीं असें जाणावें.

# आतां व्रताचा प्रयोग.

उपवासाच्या पूर्व दिवसीं प्रातःकालीं नित्यकर्म केल्या नंतर, "दशमी पासून तीन दिवस मी तुझें व्रत करितों, हे देव देवेश केशवा, तें निर्विघ्न कर.," या प्रमाणे संकल्प करून मध्यान्हीं एकभुक्त करावें; त्याचे नियम—कांस्यपात्रांत भोजन, मांस, मधुरा, दिवसा निद्रा, अति भोजन, अति उदकपान, पुनः भोजन, मैथुन, मद्य, अनृत भाषण, चणे, कोद्रू, शाका, परान्न, द्यूत, तैल, तिलपिष्ट, तांबूल, हीं वर्ज्य करावीं. एकभुक्त व्रताचे ठायीं काष्टानें दांत घांसावे. रात्रीं भूमीवर शयन करून एकादशीचे दिवसीं प्रातःकालीं वृक्षाच्या पानादिकानें दंतधावन करावें. काष्टानें करूं नये. स्नानादि नित्यकर्म केल्या नंतर हातांत दर्भपवित्रक धारण करून उत्तर दिशेस मुख करून उदकानें भरलेलें ताम्रपात्र हातांत घेऊन संकल्प करावा. तो असा " **एकादश्यां निराहारोभूत्वाऽहमपरेऽहनि ॥ भोक्ष्यामिपुंडरीकाक्ष शरणं मे भवाच्युत**" किंवा या मंत्रानें पुष्पांजली विष्णूला अर्पण करावी. अशक्त असेल त्याणें तर " **एकादश्यां जलाहारो एकादश्यां क्षीर भक्षो एकादश्यां फलाहारो एकादश्यां नक्तभोजी** " इत्यादि ऊहें करून

यथाशक्ति संकल्प करावा. शैवांनीं रुद्रगायत्रीनें संकल्प करावा. सूर्योपासकांनीं नित्यगायत्रीनें किंवा नाममंत्रानें संकल्प करावा. हा संकल्प सूर्योदया नंतर दशमी असल्यास स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं रात्रीं करावा. मध्य रात्रीनंतर दशमी असेल तर सर्वत्रांनीं एकादशीचे दिवशीं माध्यान्हकाला नंतर करावा. संकल्प केल्या नंतर अष्टाक्षर मंत्रानें तीन वेळ उदक मंत्रून तें प्राशन करावें. नंतर पुष्पांचा मंडप करून सामर्थ्ये पुष्पें, गंध, धूप, दीप, नैवेद्य, कांहीं उत्तम स्तोत्रें, नानाप्रकारचीं सुस्वर गीतें, मनोहर वाद्यें, साष्टांग नमस्कार व उत्तम जयशब्द, यांनीं विधियुक्त विष्णूची पूजा करून रात्रौ जागरण करावें.

## एकादशीचे ठायीं करावयाचे नियम.

पाखंडी याजबरोबर संभाषण, स्पर्श, दर्शन हीं वर्ज्य करावीं- ब्रह्मचर्य, सत्यभाषण, दिवसा निद्रा करणें, हे एकादशीचे नियम होत. तसेच परिभाषेंत सांगितले ते जाणावे. पाखंडी याचें दर्शन झालें तर सूर्याचें दर्शन घेतल्या नंतर शुद्ध होतो; त्याचा स्पर्श झाला असतां स्नान करून सूर्याचें दर्शन घेतल्या नंतर शुद्ध होतो; त्याच्याशीं संभाषण झाल्यास तर ज्ञाता याणे अच्युताचें चिंतन करावें. याप्रमाणें प्रायश्चित्त जाणावें. उपोषणाचे दिवसीं श्राद्ध प्राप्त झालें असतां तें करून श्राद्धान्न शेष राहील तें एका पात्रावर वाढून त्या सर्व अन्नाचें अवघ्राण करावें, व तें पात्र गाई इत्यादिकांला द्यावें. कंद, मूल, फलें, इत्यादिक भक्षण करून गौणपक्षानें उपोषण करणारा असेल त्याणें तीं कंद, मूलें, फलें, पितृस्थानीं बसलेल्या ब्राह्मणांच्या पात्रांत वाढून शेष राहतील तीं भक्षण करावीं. "हे राजा, जे वेळीं एकादशीचे ठायीं मृत झालेल्यांचा श्राद्ध दिवस येईल त्या प्रसंगीं तो दिवस टाकून द्वादशीचे दिवसीं श्राद्ध करावें" इत्यादि वचनें यथाचार वैष्णवपर जाणावीं. वैष्णवांना सोळा **महालय** करणें असल्यास त्यांनीं "**एकादश्यधिकरणकद्वादश्यधिकरणकंचमहालयंतंत्रेणकरिष्ये**" असा संकल्प करून द्वादशीचे दिवसीं दोन महालय करावे. काम्य उपोषणाचे दिवसीं सूतक प्राप्त झालें असतां शारीरिक नियम स्वतः करून सूतक गेल्या नंतर पूजा, दान, ब्राह्मणभोजन, इत्यादिक करावें. नित्योपवासाचे दिवसीं सूतक प्राप्त होईल तर स्नान करून विष्णूला नमस्कार करावा आणि निराहारादिक नियम आपण स्वतः करून पूजा इत्यादिक ब्राह्मणद्वारा करवावी. दानें वगैरे करूं नयेत. सूतकसमाप्ती नंतर पुनः तें करण्याची आवश्यकता नाहीं. या प्रमाणें रजस्वलादि दोष प्राप्त झाले असतांहि समजावें. द्वादशीचे दिवसीं प्रातःकाळीं नित्य पूजा करून भगवंताकारणें व्रतसमर्पण करावें; "अज्ञानतिमिरांधस्य व्रतेनानेन केशव, प्रसीद सुमुखो नाथ ज्ञानदृष्टिप्रदोभव" दशमी इत्यादिक तीन दिव-

सांगितलेल्या नियमांचा भंग होईल, किंवा दिवसा निद्रा, अतिउदकपान, मिथ्या भाषण, यांतून जें घडेल तेणेंकरून जो नियम भंग होईल त्याच्या उद्देशें नारायणाचे अष्टाक्षरमंत्राचा एकशेंआठ वेळ जप करावा. अल्प दोष असेलतर नाम ा तीनशें जप करावा. रजस्वला,चांडाळ,रजक,बाळंतीण,इत्यादिकांचे शब्द व्रतामध्यें होतील तर एकहजारआठ गायत्री जप करावा. नंतर नैवेद्य आणि तुलसी यांहीं मिश्रित ा अन्नानें पारणा करावी. पारणेचे भोजनामध्यें आवळे भक्षण केले असतां चांडा-दिकांशीं संभाषणादिक केल्याचा दोष दूर होतो. द्वादशीचें उल्लंघन केलें असतां ा दोष आहे या करितां द्वादशीमध्येंच पारणा करावी. द्वादशी अल्प असेल तर र्योदया पासून मध्यान्हकालापर्यंतचीं सर्व कर्मे अपकर्षानें करावीं. अग्निहोत्राचा अपकर्ष करूं नये असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. 'रात्रीं श्राद्ध करूं नये' असा निर्बंध आहे यास्तव श्राद्धाचाहि अपकर्ष करूं नये. अति संकट, श्राद्ध, प्रदोषादिक व्रत अशा समयीं तीर्थ घेऊन पारणा करावी. द्वादशी पुष्कळ असल्यास हरिवासर नांवाचाद्वादशीचा प्रथम पाद टाकून पारणा करावी. कलामात्रसुद्धां द्वादशी नसेल तर त्रयोदशींत पारणा करावी. माध्यान्हकाला नंतर द्वादशी असेल तर प्रातःकाला पासून साहा घटिकां मध्येंच पारणा करावी, माध्यान्ह कालीं करूं नये, असें पुष्कळ ग्रंथकारांचें मत आहे. निरनिराळ्या कर्मांचे निरनिराळे काल आहेत यास्तव अपहारण्ह कालींच पारणा करावी, असेंहि कित्येकांचे मत आहे. सर्व मासांचे ठायीं शुक्ल-पक्षांतील किंवा कृष्णपक्षांतील द्वादशीचे दिवसीं श्रवण नक्षत्राचा योग असल्यास तशक्तानें एकादशी आणि द्वादशी या दोनहि दिवसीं उपोषण करावें. अशक्त असेल त्याणे एकादशीचे दिवसीं फलाहार इत्यादिक गौणपक्ष स्वीकारून श्रवण द्वाद शीला उपोषण करावें. विष्णुशृंखल योग असेल तर एकादशीचे दिवसींच श्रवण ादशीचा उपवास करून श्रवणयोगविरहित अशा द्वादशीचे दिवसीं पारणा करावी. ादशी श्रवणापेक्षां कमी असेल तर द्वादशीचें उल्लंघन झालें असतां महादोष आहे या करितां श्रवणयुक्त द्वादशीमध्येंच पारणा करावी. विष्णुशृंखलयोगादि कांचा निर्णय भाद्रपद मासांतील श्रवणद्वादशी ...र्णी सांगण्यांत येईल. दिवसा निद्रा, परान्नभोजन, दुसऱ्यानें भोजन, मद्य, कांस्यपात्रांतभोजन, आमिष, तेल, हे आठ प्रकार द्वादशीचे दिवसीं वर्ज्य करावे. द्यूत, क्रोध, चणे, कोद्रू, उडीद, तिलपिष्ट, मसुरा, नेत्रांतअंजन घालणें, मिथ्याभाषण, लोभ, आयास, प्रयाण, भारवाहणें, अध्ययन, तांबूल, इत्यादिक वर्ज्य करावीं. हे सर्व नियम काम्य व्रताविषयीं अवश्य पाळावे. नित्यव्रताविषयीं तर सशक्त मनुष्यानें विशेषेंकरून नियम पाळावे. मुख्य

नियमांविषयीं अशक्त असल्यास अहोरात्र उपोषण करावें. इंद्रियनिग्रही होत्साता, श्रद्धायुक्त, विष्णुतत्पर, असा. एकादशीचे दिवशीं उपोषण केल्यानें पापापासून निःसंशय मुक्त होतो. दुसऱ्याला 'भोजनकर, असें सांगतो अथवा भोजन करितो ते दोघेहि नरकाप्रत जातात. एकादशीव्रताचे योगानें संपत्ति व विष्णूची सायुज्यताही प्राप्त होतात. याप्रकारें करून एकादशीव्रताचा निर्णय झाला. काम्यांतराचे ठिकाणीं द्वादशीयुक्तच एकादशी घ्यावी. ॥ याप्रमाणे एकादशीचा निर्णय झाला. उद्देश १७॥

# द्वादशीचा निर्णय.

द्वादशीतर एकादशीनें विद्ध असेल ती घ्यावी. आतां आठ प्रकारच्या **महाद्वादशी** आहेत. त्या अशा--शुद्धादिक एकादशीनें युक्त जी द्वादशी तिला **उन्मीलनी** ह्मणतात. शुद्धादिक द्वादशीच वाढते तिला **वंजुली** ह्मणतात. सूर्योदयाला एकादशी, त्यानंतर क्षयाला पोंचणारी द्वादशी, आणि दुसऱ्या दिवशीं सूर्योदयीं त्रयोदशी, याप्रमाणे एका अहोरात्रीचे ठायीं तीन तिथींला स्पर्श होतो ह्मणून त्या द्वादशीला **त्रिस्पर्शा** असें ह्मणतात. अमावास्येची किंवा पौर्णिमेची ज्या प्रसंगीं दिनवृद्धि होते तेव्हां **पक्षवर्द्धिनी** द्वादशी. पुष्यनक्षत्रानें युक्त ती **जया.** श्रवणानें युक्त ती **विजया.** पुनर्वसूनें युक्त ती **जयंती.** रोहिणीनें युक्त ती **पापनाशिनी.** पापाचा क्षय व मुक्ति यांची इच्छा करणाऱ्यांनीं आठ द्वादशींला उपोषण करावें. श्रवण नक्षत्रानें युक्त जी द्वादशी ती एकादशीप्रमाणें **नित्य** आहे. या आठ द्वादशींतून कोणतीही द्वादशी व एकादशी या दोन्ही एकदिवशीं प्राप्त झाल्यास एकतंत्रानें उपवास करावा. निरनिराळ्या दोनदिवशीं असतां सशक्त मनुष्यानें दोन उपोषणें करावीं. जर दोन व्रतें पूर्वी आरंभिलेलीं असून दोन उपोषणें करण्यास शक्ति नसेल तर द्वादशीचें उपोषण केल्यानें दोन व्रतांचें पुण्य प्राप्त होतें. त्या उपोषणा विषयीं श्रवणनक्षत्राचा योग दोन घटिका असल्यास तोही घ्यावा. उपोषण असल्यास पुष्य, पुनर्वसु व रोहिणी, हीं नक्षत्रें सूर्योदयापासून अस्तमानपर्यंत जशीं असतील तशीं घ्यावीं. पारणा करावयाची ती तर तिथि व नक्षत्र यांच्या संयोगीं उपोषण असेल तर दोहोंच्या अंतीं किंवा दोहोंतून एकाच्या अंतीं करावी, असा सर्वमान्य निर्णय जाणावा. ॥ या प्रकारें करून द्वादशीचा निर्णय झाला. उद्देश १८ ॥

# त्रयोदशीचा निर्णय.

त्रयोदशी, शुक्लपक्षांतील पूर्वदिवसाची व कृष्णपक्षांतील दुसऱ्या दिवसाची घ्यावी. शनिवारानें युक्त अशा कोणते तरी एका त्रयोदशीस आरंभ करून एक वर्ष पर्यंत प्रत्येक पक्षाचे ठायीं किंवा शनिवारयुक्त चोवीस शुक्ल त्रयोदशींचे ठायीं आच-

रावयाचें जें प्रदोषकालीं शिवपूजा नक्तभोजनात्मक व्रत, त्या व्रताविषयीं सूर्यास्तानंतर सहा घटिका जो प्रदोषकाल त्यास व्यापणारी त्रयोदशी घ्यावी. दोन दिवस प्रदोषकालव्याप्ति असेल, किंवा दोनदिवस प्रदोषकालीं सारखी एकदेशव्याप्ति असेल तर पुढची घ्यावी. दोनदिवस विषममानानें एकदेशव्याप्ति असेल, आणि देवपूजा, भोजन, हीं त्या एकदेशव्याप्तीमध्ये होत इतकी अधिक न मिळेल तर पूर्वीचीहि घ्यावी. तसें नसल्यास साम्य पक्षाप्रमाणें पुढचीच घ्यावी. दोनही दिवसीं सर्वथा व्याप्ति नसली तथापि पुढचीच घ्यावी. ॥ याप्रमाणें त्रयोदशीचा निर्णय झाला. उद्देश १९ ॥

# चतुर्दशीचा निर्णय.

चतुर्दशीतर शुक्लपक्षांतील दुसऱ्या दिवसाची व कृष्णपक्षांतील पूर्व दिवसाची घ्यावी. प्रत्येक महिन्याचे कृष्ण चतुर्दशीचे दिवसीं काम्य असें शिवरात्रिव्रत करितात, त्याविषयीं महाशिवरात्रीप्रमाणे मध्यरात्रव्यापिनी असेल तीच घ्यावी. दोनदिवसीं मध्यरात्रव्याप्ति असेल तर प्रदोषकालव्याप्ति अधिक आहे या करितां दुसऱ्या दिवसाची घ्यावी. प्रदोषव्याप्तीच्या अधिकत्वास्तव कितीएक प्रदोषमात्रव्यापिनी ग्रहण करितात. परंतु त्या प्रसंगीं मूळ विचार करावा. जेव्हां चतुर्दशीचे दिवसीं दिवसा भोजनचा निषेधच नित्य पाळला जातो तेव्हां भोजनकालव्यापिनी चतुर्दशी टाकून त्रयोदशींत किंवा पौर्णिमेंत भोजन करावें. शिवरात्रिव्रत करणारांनीं तर चतुर्दशींतच पारणा करावी. चतुर्दशी, अष्टमी, यादिवसीं दिवसा भोजनाचा निषेध सांगितला तो या ठिकाणीं नाहीं. कारण, विधिप्राप्ताविषयीं निषेध प्रवृत्त होत नाहीं. ॥ या प्रमाणे चतुर्दशीचा निर्णय झाला. उद्देश २० ॥

# पौर्णिमा व अमावास्या यांचा निर्णय.

सावित्रीव्रताखेरीज पौर्णिमा व अमावास्या दुसऱ्या दिवसीं असतील त्या घ्याव्या. श्रावणांतील व फाल्गुनांतील पौर्णिमा कुलधर्म इत्यादिक कर्मांविषयीं पूर्वविद्धा घेण्याविषयीं सांगितलें, यावरून कितीएक ग्रंथकार कुलधर्माविषयीं सर्व पौर्णिमा पूर्वीचीच घेतात, परंतु त्याजबद्दल मूळ शोध करावा. चतुर्दशी १८ घटिकांहून कमी असेल तर " चतुर्दशी १८ घटिकांनीं पौर्णिमेला दूषित करिते " या वचनावरून चतुर्दशीच्या तशा वेधाचा दोष नाहीं असें आहे, त्या पेक्षां तशा प्रसंगीं कुलधर्माविषयीं पूर्व दिवसाचीच घ्यावी. परंतु १८ घटिकांपेक्षां अधिक चतुर्दशीचा वेध असेल तर पूर्वतिथीनें विद्ध असी पौर्णिमा घेऊं नये असें मला वाटतें. अमावास्येचे दिवसीं भौमवाराचा किंवा सोमवाराचा योग असेल तर स्नानदानादिकांविषयीं महा पुण्य

कारक आहे. या प्रमाणेंच भानुसप्तमी, भौमयुक्त चतुर्थी जाणावी. सोमवारानें युक्त अशा अमावास्येचे दिवशीं अश्वत्थपूजादिरूप जें सोमवतीव्रत करितात, त्या विषयीं अपराण्हकालपर्यंत दोन घटिका जरी अमावास्येचा योग असेल तथापि व्रत करावें दिवसाच्या शेवटील सहा घटिका जो सायान्हकाल त्याचे ठायीं, आणि रात्रीं योग असल्यास करूं नये, असा शिष्टाचार आहे. संन्यासी यांणीं क्षौरादिक कर्मांविषयीं सूर्योदयकालीं त्रिमुहूर्तव्यापिनी पौर्णिमा घ्यावी. तिसऱ्या मुहूर्ताला स्पर्श नसेल तर चतुर्दशीयुक्त असेल ती घ्यावी. ॥ या प्रमाणें पौर्णिमेचा निर्णय झाला. उद्देश ॥ २१ ।

# आतां इष्टिकाल.

पक्षाच्या शेवटले उपवासकाल, आणि पक्षाचे आद्य यजनकाल. अन्वाधान नामक जे कर्म त्याचें नांव उपवास. पर्वाचा जो चवथा अंश, आणि प्रतिपदेचे पहिले तीन अंश मिळून जो काल तो यागकाल जाणावा. तो प्रातःकाळीं पंडितांनीं सांगितला प्रतिपदेच्या चवथ्या चरणाचे ठायीं याग करूं नये असा नियम आहे. पर्वाचे दिवस अन्वाधान करून दुसऱ्या दिवशीं याग करावा, अशा प्रकारच्या उक्तकालाची सहज प्राप्ति होते. या करितां पर्व व प्रतिपदा संपूर्ण असतील तर त्याज विषयीं संशय नाहीं पर्व खंडित असल्यास पर्वापेक्षां प्रतिपदेच्या क्षयवृद्धीच्या घटिका मोजून क्षय असत निमे घटिका पर्वांत कमी कराव्या; व वृद्धी असतां पर्वांत मिळवाव्या. व त्याजवरून संधिकाल जाणून त्याचे योगानें अन्वाधानादि कालाचा निर्णय करावा. जेथें क्षयवृद्धि होत नाहीं, तेथें जो आहे तो स्पष्टच संधि आहे. **संधि चार प्रकार—पूर्वाण्हसंधि मध्यान्हसंधि, अपराण्हसंधि,** आणि **रात्रिसंधि.** या प्रमाणे दिवसाचे दोन भाग करून सूर्योदया पासून दोन प्रहर पर्यंत जो काळ तो पूर्वाण्हकाल, व दिवसाचा पुढील अर्धा भाग तो अपराण्हकाल. पूर्वाण्हाची शेवटची एक घटिका व अपराण्हाची प्रथमची एक घटिका, मिळून ज्या दोन घटिका संधिभूत होतात, तो माध्यन्ह संधि; याला कौस्तुभामध्यें **अवर्तन** असें दुसरें नांव आहे. एकपलमात्र असा जो दोहोंकडील संधि तोच माध्यान्हसंधि, दोन घटिकांचा तो कांहीं माध्यान्यसंधि नाहीं, अशा प्रकारचा बहुत करून हलीं शिष्टाचार आहे. या करितां पूर्वी सांगितलेल्या रीतीनें ज्या प्रमाणें क्षय किंवा वृद्धि असेल त्या प्रमाणें घटिका कमी कराव्या किंवा मिळवाव्या, आणि संधीचा निर्णय करावा. पर्व आणि प्रतिपदा यांचा संधि पूर्वाण्हीं किंवा माध्यान्हीं होईल तर ज्या दिवशीं संधि होईल त्याच्या पूर्व दिवशीं अन्वाधान करावें आणि संधि दिवशीं याग करावा. अपराण्हकालीं किंवा रात्रीं जर संधि होईल तर संधिदिवस

अन्वाधान आणि त्याच्या दुसऱ्या दिवसीं याग करावा. याचें उदाहरण—पर्व १७ घटिका, प्रतिपदा ११ घटिका, प्रतिपदेचा क्षय ६ घटिका, त्या क्षयाचें अर्ध तीन घटिका पर्वांत कमी केल्या,तेव्हां चवदा घटिकापरिमित संधि झाला; आतां हा तीस घटिकांच्या दिनमानानें पूर्वाण्हसंधि होतो. २८ घटिका दिनमान असेल तर माध्यान्हसंधि होतो. या उदाहरणांत संधिदिवसाचे ठायीं याग आणि त्याच्या पूर्व दिवसीं अन्वाधान या प्रमाणें करावीं. दुसरें उदाहरण—पर्व १४ घटिका, प्रतिपदा १९ घटिका; येथें वृद्धि ५ घटिका, त्या वृद्धीचें अर्ध अडीच घटिका, त्या पर्वांत मिळविल्या तेव्हां साडे सोळा घटिकाप्रमाण संधि झाला. आतां हा तीस घटिकांच्या दिनमानानें अपराण्हसंधि होतो; या उदाहरणांत संधिदिवसाचे ठायीं अन्वाधान व दुसऱ्या दिवसीं याग या प्रमाणे करावीं.

## आतां सर्वांना बोध व्हावयाकरितां याचे आणखी भेद सांगतों.

सूर्योदया नंतर पर्वाच्या ज्या घटिका शेष असतील त्या आणि प्रतिपदेच्या घटिका, सर्व एकत्र मिळवाव्या. नंतर त्या एकत्र केलेल्या सर्व घटिका दिनमानाहून कमी असतील तर पूर्वाण्हसंधि, दिनमानाशीं समान असल्यास मध्यान्हसंधि, आणि दिनमानाहून अधिक होतील तर अपराण्हसंधि, या प्रमाणें संधि जाणावे. या प्रमाणे सूर्योदया नंतर येणारे जे पर्व व प्रतिपदा त्यांच्या क्षयवृद्धीवरूनच संधि पाहतात. हाच आचार प्रस्तुत सर्वत्र शिष्टाचाराचे ठिकाणीं प्रसिद्ध आहे. कौस्तुभादि ग्रंथांमध्यें तर चतुर्दशीचे दिवसांतल्या उदयाच्यापूर्वी पर्वाच्या गतघटिका, आणि उदया नंतर पुढच्या घटिका या एकत्र मिळवाव्या, या प्रमाणे प्रतिपदेच्या पूर्वदिवसाच्या घटिका व दुसऱ्या दिवसाच्या घटिका, या सर्व एकत्र मिळवाव्या, व पर्वाच्या अपेक्षेनें प्रतिपदेची वृद्धि किंवा क्षय हीं जाणावीं. ह्मणजे तें असे—चतुर्दशी २२ घटिका, पर्व १७ घटिका, चतुर्दशीचे दिवसांतल्या पर्वघटिका ३८, पुढल्या दिवसांतल्या पर्वघटिका १७, ह्या सर्व एकत्र मिळवून ५५ झाल्या. पर्वदिवसांतल्या प्रतिपदेच्या घटिका ४३, पुढल्या दिवसांतल्या प्रतिपदेच्या घटिका ११, त्या सर्व एकत्र मिळवून ५४घटिका झाल्या. या उदाहरणामध्यें प्रतिपदेचा क्षय एक घटिका, त्याचें अर्ध अर्धी घटिका, ती पर्वांत कमी केली तेव्हां साडे सोळा घटिकाप्रमाण संधि झाला, ह्मणून हा आपराण्हसंधि होतो. पूर्वोच्या मताप्रमाणे तर या उदाहरणांत पूर्वाण्हसंधि होतो. या प्रमाणेंच चतुर्दशी २४ घटिका, पर्व १७घटिका,गत घटिका ३६, येणाऱ्या घटिका मिळविल्या तेव्हां ५३ घटिका झाल्या. प्रतिपदा घटिका ११, गतघटिका आणि येणाऱ्या घटिका या एकत्र केल्या तेव्हां५४

झाल्या. या उदाहरणांमध्यें पूर्वी सांगितलेल्या रीतीनें क्षयाच्या उदाहरणांमध्यें वृद्धि एक घटिका, तिचें अर्ध अर्ध घटिका, ती मिळविली तेव्हां साडेसतरा घटिकाप्रमाण अपराण्हसंधि झाला. या प्रमाणें ह्या पूर्वीच्या मताचा, आणि ह्या मताचा वृद्धि, क्षय इत्यादि सर्वच विपरीत आहे या करितां परस्पर अत्यंत विरोध झाला. ह्या मतामध्यें दोन घटिकांहून अधिक वृद्धि किंवा क्षय संभवत नाहीं. 'दुसऱ्या दिवशीं ज्या घटिका कमी किंवा अधिक या प्रमाणें बहुवचन आहे' तें असंगत होय, असें पुरुषार्थचिंतामणीमध्यें दूषण दिलेलें आढळतें.

## आतां पौर्णिमेविषयीं विशेष निर्णय.

संगवकालानंतर तेराव्या घटिकेस आरंभ करून अर्ध्या दिवसाच्यापूर्वी संधि असेल आणि पौर्णिमा तत्कालच असेल तर पौर्णिमेमध्यें संधिदिवसाच्याठायींच अन्वाधान करून त्याचवेळीं याग करावा. पौर्णिमेचे दिवशीं अन्वाधान व याग करण्याविषयीं सांगितलें तो विकल्प आहे असें कितीएक ग्रंथकारांचें मत आहे. अमावास्येमध्यें निरनिराळे सर्वत्र प्रसंगीं दोन काळ असतात. कोणतेहि वेळीं एककालीं ते कर्मास उपयोगी येत येत नाहींत. पौर्णिमेमध्यें किंवा अमावास्येमध्यें अपराण्हसंधि असेल तर प्रतिपदेचे चवथ्या चरणाचेठायीं याग केला असतां दोष नाहीं. अमावास्येमध्यें अपराण्हसंधि असतांहि प्रतिपदेचेठायीं सहा घटिकांहून अधिक इतकी द्वितीया प्रविष्ट असेल तर त्या दिवशीं चंद्रदर्शनाचा संभव आहे, व चंद्रदर्शनाचे दिवशीं याग करण्याचा निषेध आहे, या करितां बौधायन इत्यादिकांनीं चतुर्दशीमध्यें अन्वाधान करून अमावास्येतच इष्टि करावी. अमावास्येचे दिवशीं सातघटिका प्रतिपदा नसेल तर चंद्रदर्शन असलें तथापि बौधायनांनीं प्रतिपदेतच इष्टि करावी. आश्वलायन, आपस्तंब, इत्यादिकांला तर चंद्रदर्शनाचा निषेध नाहीं, याकरितां त्यांनीं प्रतिपदेतच इष्टि करावी. जेव्हां संधिदिवसाचे ठायीं इष्टि प्राप्त होईल तेव्हां ती प्रतिपदेंतच समाप्त करावी, पर्वांत तिची समाप्ति करूं नये. कारण पर्वगांत यागाची समाप्ति झाली असतां पुनः याग करावा लागतो. याचप्रमाणें स्मार्ताग्निसंबंधि पार्वणस्थालीपाकाचा निर्णय जाणावा. कित्येक ग्रंथकार तर असा विशेष सांगतात कीं, स्मार्ताग्नि संबंधीं स्थालीपाक प्रतिपदेंतच समाप्त करावा असा नियम नसून पूर्वाण्हकालींच स्थालीपाक समाप्त करून संधिनंतर प्रतिपदेंत ब्राह्मणभोजन मात्र करावें. कारण संधीच्या जवळचा जो प्रातःकाळ त्यांतच स्थालीपाक करावा असें जयंतहि ह्मणतो. श्रौतकर्मामध्येंहि प्रतिपदेमध्यें ब्राह्मणभोजन मात्र करावें, व इतर सर्व कर्म पूर्वाण्हसंधींतच समाप्त करावें, त्या विषयीं प्रतिपदेची गरज नाहीं, असें **पुरुषार्थचिंतामणींत** सांगितलें आहे. पौर्णिमेच्या इष्टिकालाविषयींचा कात्यायनांचा निर्णय, पूर्वी सर्वत्रांस

साधारणपणें सांगितला तोच जाणावा, त्याबद्दल निराळा विशेष निर्णय नाहीं, असें निर्णयसिंधु आदिकरून पुष्कळ ग्रंथकर्त्यांचें मत आहे. दुसरे ग्रंथकार तर, पूर्वाण्हसंधी-मध्यें संधीच्या दिवसीं अन्वाधान करावें, आणि दुसऱ्यादिवसीं याग करावा, असा कात्यायनांला पौर्णिमेचा विशेष निर्णय सांगतात.

# आतां अमावास्येविषयीं कात्यायनांचा विशेष निर्णय.

अमावास्येविषयीं दिवसाचे तीन भाग करावे. त्यां पैकीं पहिला भाग तो पूर्वाण्ह, दुसरा भाग मध्यान्ह, व तिसरा अपराण्ह. त्यांमध्यें रात्रिसंधीचे ठायीं प्रतिपदेच्या दिवसीं चंद्रदर्शन असलें तथापि कात्यायनांनींहि इतरांप्रमाणेंच संधिदिवसीं पिंड-पितृयज्ञ व अन्वाधान हीं करून दुसऱ्या दिवसीं इष्टि करावी, असा निर्णय निर्विवाद आहे. पूर्वाण्ह, आणि दिवसाचा दुसरा भाग जो मध्यान्ह त्याचे ठायीं संधि असतां संधीच्या पूर्वदिवसीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करून संधीचे दिवसीं इष्टि करावी. आतां चतुर्दशीचे दिवसीं अमावास्येचा दिनतृतीय भाग जो अपराण्हकाल त्याचे ठायीं अमावास्येची पूर्वव्याप्ति असेल तर अमवास्येनें युक्त अशा अपराण्हकालीं निःसंशय पिंडपितृयज्ञ करावा. या प्रमाणें तिसरा भाग जो अपराण्हकाल याचा शेवटील भाग जो अपराण्हकालाचा एकदेश त्याचे ठायीं अमावास्येची व्याप्ति असेल तर अमावास्या प्राप्त झाली असतां तींत पिंडपितृयज्ञ करावा, चतुर्दशींत करूं नये, असा एक पक्ष; त्या प्रसंगीं चंद्र अत्यंत क्षीण असतो या करितां चतुर्दशीच्या शेवटील भागांत पिंडपितृयज्ञ करावा हा दुसरा पक्ष. आतां अपराण्हसंधीचे ठिकाणीं चार पक्ष. संधिदिवसाचे ठायींच दिवसाचा तिसरा भाग जो अपराण्हकाल त्याचे ठिकाणीं अमावास्येची पूर्ण व्याप्ति असणें हा पहिला पक्ष, तो असा—चतुर्दशी १९ घटिका, अमावास्या ३०, प्रतिपदा २९, दिनमान ३०, याठिकाणीं संधिदिवसीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करावे, आणि दुसऱ्या दिवसीं याग करावा. संधीच्या पूर्वदिवसींच अप-राण्हकालीं अमवास्येची पूर्ण व्याप्ति असणे हा दुसरापक्ष, तो असा—चतुर्दशी२०घटिका, अमावास्या २२ घ०, प्रतिपदा २४, दिनमान ३०, याठिकाणीं संधिदिवसाच्या दुसऱ्या दिवसीं सहाघटिकापरिमित जो प्रातःकाल त्याचेठायीं प्रतिपदेचे तीन चरणापर्यंत यज्ञ-काल मिळतो या करितां संधिदिवसीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करावे, आणि प्रतिपदेचे दिवसीं इष्टि करावी, असें कौस्तुभाचें मत आहे. "प्रतिपदेचे दिवसीं अपराण्हकालीं तीन मुहूर्तपर्यंत द्वितीया असेल,तर दुसऱ्या दिवसीं चंद्रदर्शन होईल याकरितां चतुर्दशीचे

ठायीं अन्वाधान करावें" असें वचन आहे, यास्तव चतुर्दशीचे दिवशीं पिंडपितृयज्ञ व अन्वाधान हीं करावीं, आणि संधिदिवशीं इष्टी करावी, असें इतर ग्रंथांचें मत आहे. आतां आणखी दुसऱ्या पक्षाचें उदाहरण—चतुर्दशी १८ घ०, अमावास्या १८, प्रतिपदा १९, दिनमान२७, याठिकाणीं प्रतिपदेच्या दिवशीं प्रातःकालीं, प्रतिपदेचे प्रथमचे तीन चरण जो यज्ञकाल तो याठिकाणीं नाहीं यास्तव सर्वांच्यामतें कात्यायनांनीं संधिदिवशींच इष्टि करावी, आणि पूर्वदिवशीं अन्वाधान व पिंडापितृयज्ञ करावे. आतां दोनदिवशीं सारखी किंवा कमीजास्त एकदेशव्याप्ति असणे हा तिसरा पक्ष. तो असा—चतुर्दशी २९ घ०, अमावास्या २९, प्रतिपदा २४, दिनमान ३०, ही सारखी अपराण्हव्याप्ति, याविषयीं कौस्तुभाचें व इतरांचें मत यांचा, पूर्वीं सांगितलेल्या रीतीनें दोन प्रकारचा निर्णय होतो. तसेंच—चतुर्दशी २५ घ०, अमावास्या २०, प्रतिपदा १७, दिनमान २७, ही देखील सारखी एकदेशव्याप्ति होय. या ठिकाणीं सर्वानुमतें संधिदिवशींच कात्यायनांनीं इष्टि करावी, आणि पूर्वदिवशीं पिंडपितृयज्ञ व अन्वाधान हीं करावीं. विषममानेंकरून दोन दिवशीं एकदेशव्याप्ति असणें; चतुर्दशी २९ घ०, अमावास्या २३ घ०, प्रतिपदा २३, दिनमान ३०, या ठिकाणींहि पूर्वीं सांगितलेल्या दोन मतांनीं दोन प्रकारचा निर्णय जाणावा. जसें—चतुर्दशी २९ घ०, अमावास्या २२, प्रतिपदा१८, दिनमान ३०, ही देखील विषममानेंकरून एकदेशव्याप्ति आहे. या प्रसंगींहि सर्वांच्या मतानें संधिदिवशीं कात्यायनांनीं इष्टि करावी, आणि चतुर्दशीचे दिवशीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करावा. किंवा जसें—चतुर्दशी २५घटिका, अमावास्या २७, प्रतिपदा २९, दिनमान ३०, या ठिकाणीं संधिदिवशीं अन्वाधान व याग करून प्रतिपदेचे दिवशीं इष्टि करावी. संधिदिवशींच एकदेशव्याप्ति असणें हा चवथा पक्ष. तो असा—चतुर्दशी ३१, घटिका अमावास्या २६, प्रतिपदा २३, दिनमान ३०,—अथवा जसें—चतुर्दशी २८, अमवास्या २२, प्रतिपदा १७, दिनमान २७, या दोनही प्रसंगीं संधिदिवशींच पिंडपितृयज्ञ व अन्वाधान हीं करावीं, आणि दुसऱ्या दिवशीं प्रतिपदेचे ठायीं याग करावा. याचप्रमाणें कात्यायनमताचे ठायीं सर्वत्र उदाहरणांत चंद्रदर्शनाचा निषेध पाळणें असंभवनीय, ह्मणून कितीएक प्रसंगीं चंद्रदर्शनाचा निषेध मानून पूर्व दिवशीं यागादिक करण्यास सांगितले व क्वचित् प्रसंगीं चंद्रदर्शनयुक्त दिवशींच यागादि करण्यास सांगितलें. याचप्रमाणें पिंडपितृयज्ञाविषयींहि जाणावें. दर्शश्राद्धाविषयीं अमावास्येचा सर्व साधारण निर्णय पुढें निराळाच सांगण्यांत येईल.

## आतां सामवेदींच्या इष्टीचा निर्णय.

या विषयीं पौर्णिमा सर्वसाधारणपक्षानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणेंच घ्यावी. अमा

वास्येचे दिवशीं तर रात्रिसंधि असतां चंद्रदर्शन असलें तथापि प्रतिपदेचे दिवशींच याग करावा. अपराण्हसंधि असल्यास प्रातःकाळच्या सहा घटिका परिमित अशा प्रतिपदेच्या पहिल्या तीन पादांपैकीं यज्ञकालाचा लाभ होईल तर चंद्रदर्शन असलें तथापि प्रतिपदेचे दिवशीं इष्टि करावी, आणि संधिदिवशीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करावे. पूर्वीं सांगितलेला यागकाल न मिळाल्यास, संधिदिवशीं याग करावा, व त्याच्या पूर्वदिवशीं चतुर्दशीचे ठायीं पिंडपितृयज्ञ व अन्वाधान करावें. या प्रमाणे सामवेदी यांनींहि चंद्रदर्शनाचा निषेध कात्यायनांप्रमाणें जसा संभवेल तसा पाळावा. या प्रकारें करून सामवेदी यांचा निर्णय सांगितला. ॥ या प्रमाणें यागकालाचा निर्णय झाला. उद्देश २२ ॥

# आतां पिंडपितृयज्ञानाचा काल.

ज्या अहोरात्रीमध्यें अमावास्या व प्रतिपदा यांचा संधि होईल त्या दिवसाचे पांच भाग करावे. त्यां पैकीं चवथा भाग तो अपराण्हकाल. त्या ठिकाणीं आश्वलायनांनी पिंडपितृयज्ञ करावा. तो अपराण्हसंधि असल्यास अन्वाधानाचे दिवशीं होतो, मध्यान्ह किंवा पूर्वाण्हसंधि असल्यास यागाच्या दिवशीं यागानंतर अपराण्हकालीं होतो. जेव्हां दिवस आणि रात्र यांच्या संधीचेठायीं तिथिसंधि येईल तेव्हां अन्वाधानाच्या दिवशींच पिंडपितृयज्ञ करावा. या प्रमाणें आपस्तंब व हिरण्यकेशी यांच्या मताप्रमाणे चालणारे असतील त्यांनींहि संधिदिवशींच अपराण्हकालीं किंवा बरोबर दोन प्रहरीं पिंडपितृयज्ञ करावा. दिवसाचे पांच भाग करून चवथा भाग तो अपराण्हकाल, किंवा दिवसाचे नऊ भाग करून सातवा भाग तो अपराण्हकाल समजावा. सांख्यायन, कात्यायन, आणि सामवेदी, यांणीं अन्वाधानदिवशींच पिंडपितृयज्ञ करावा असें पूर्वींच सांगितलें आहे, तो पिंडपितृयज्ञ, दिवसाचे तीन भाग करून त्या पैकीं तिसरा भाग जो अपराण्हकाल त्या प्रसंगीं करावा. दर्शश्राद्ध व पिंडपितृयज्ञ हीं एकच दिवशीं प्राप्त होतील तर गृह्याग्नि धारण करणारे असे जे ऋग्वेदी यांणीं तीं अनुष्ठानें व्यतिषंगानें करावीं. व्यतिषंग ह्मणजे बरोबर दोन्ही कर्में करावयाचीं. पर्व खंड असेल तर पूर्व दिवशीं नुसतें दर्शश्राद्ध करून दुसऱ्या दिवशीं पिंडपितृयज्ञ करावा. जे अग्निहोत्री असतील त्यांणीं मात्र पिंडपितृयज्ञ दक्षिणाग्नीचे ठिकाणीं करावा. दर्शश्राद्धा बरोबर करूं नये. संपूर्ण अमवास्या असल्यास अग्निहोत्री यांणीं पुढें सांगितल्या प्रमाणें क्रमानें करावें.—प्रथम अन्वाधान, नंतर वैश्वदेव, नंतर पिंडपितृयज्ञ, आणि त्या नंतर दर्शश्राद्ध असें करावें. अग्निहोत्री अशा जीवत्पितृकानें त्याच वेळीं किंवा

होमाच्या नंतर पिता इत्यादिक जी पितृत्रयी तिच्या उद्देशानें पिंडसहित किंवा पिंड रहित असा पिंडपितृयज्ञ करवा, किंवा पिंडपितृयज्ञाला आरंभ करूं नये. इष्टीचा लोप झाला असतां पादकृच्छ्र प्रायश्चित करावें. दोन इष्टींचा लोप झाला असतां अर्धकृच्छ्र. तीन इष्टींचा लोप झाल्यास त्याचे योगानें अग्निनाश होतो, या करितां पुनः अग्निस्थापना करावी. पिंडपितृयज्ञाचा लोप होईल तर वैश्वानरेष्टिरूप प्रायश्चित करावें, किंवा इष्टिस्थानाचे ठायीं "सप्तहोमारं होष्यामि" असा संकल्प करून त्या मंत्रानें चार वेळ घृत घेऊन पूर्णाहुति करावी. ॥ या प्रमाणें पिंडपितृयज्ञानाचा निर्णय झाला. उद्देश २३ ॥

## आतां श्राद्धाविषयीं अमावास्येचा निर्णय सांगतात.

*दिवसाचे पांच भाग केले असतां त्यांपैकीं चवथा भाग जो अपराण्हकाल, त्यास व्यापणारी अमावास्या दर्शश्राद्धाविषयीं घ्यावी. पूर्वदिवसींच किंवा दुसऱ्या दिवसींच अपराण्हकालीं पूर्णव्याप्ति किंवा एकदेशव्याप्ति असेल तर तीच घ्यावी.* दोनहि दिवसीं अपराण्हकालीं कमिजास्ती मानानें एकदेशव्याप्ति असेल तर ज्या दिवसीं अधिक व्याप्ति असेल ती घ्यावी. दोन दिवसीं सारखी एकदेशव्याप्ति असल्यास, तिथिक्षय असतां पूर्वींची, व तीथीची वृद्धि असेल किंवा सारखी तिथि असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन दिवसीं समव्याप्ति असतां वृद्धि, क्षय, समातिथि, यांचीं उदाहरणें—चतुर्दशी १९, अमावास्या २३, दिनमान ३०, याठिकाणीं दोनहि दिवसीं सारखी पांच घटिका एक देशव्याप्ति आहे, व चतुर्दशीहून चार घटिका अमावास्येची वृद्धि आहे याकरितां दुसऱ्या दिवसाची घ्यावी. तसेंच—चतुर्दशी २३ घ०, अमावास्या १९, याठिकाणीं एक घटिका सारखी व्याप्ति आहे व चार घटिकांनीं तिथीचा क्षय आहे, याकरितां पूर्वींची घ्यावी. आतां चतुर्दशी २१ घ०, अमावास्या २१, याठिकाणीं दोन दिवसीं तीन तीन घटिका सारखी व्याप्ति आहे, व तिथीची वृद्धि किंवा क्षय कांहींच नसून तिथि सम आहे म्हणून दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन दिवसीं पूर्ण अपराण्हव्याप्ति असेल तर तिथीची वृद्धि आहे याकरितां दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोनहि दिवसीं अपराण्हकालीं व्याप्ति नसेल तेव्हां गृह्याग्निमानांनीं **सिनीवाली** संज्ञक चतुर्दशीनें युक्त असी पूर्वींची घ्यावी. अग्निविरहित असतील त्यांनीं, व श्रौताग्निमानांनीं आणि स्त्रीशूद्रादिकांनीं **कुहू** संज्ञक प्रतिपदेनें युक्त असी दुसऱ्या दिवसाची घ्यावी, असा **माधवाचार्यांला** मान्य जो दर्शनिर्णय तोच बहुधा शिष्टांनीं सर्वत्र स्वीकारलेला आहे. पुरुषार्थचिंतामणीमध्यें तर साग्निक असे जे ऋग्वेदी व तैत्तिरीयशाखी यांनीं अपराण्हव्याप्ति नसली तथापि इष्टिदिवसाच्या पूर्वदिवसींच दर्शश्राद्ध करावें. दोन दिवसीं संपूर्ण अपराण्हव्याप्ति असल्यास दुसऱ्या दिवसीं

व दर्शश्राद्ध करावें. दोन दिवसी एकदेशें करून अपराण्हकालीं व्याप्ति असल्यास प्रतिपदेच्या वृद्धीनें प्रतिपदेचे दिवसीं इष्टि झाली असतां दुसऱ्या अमावास्येचे ठायींच दर्शश्राद्ध करावें. दुसऱ्या दिवसींच अपराण्हव्याप्ति असेल तर प्रतिपदेचा क्षय झाला आहे याकरितां दर्शाच्या दिवसींच इष्टि प्राप्त झाल्यास ऋग्वेदी यांनीं सिनीवाली व तैत्तिरीयशाखी यांनीं कुहू याप्रमाणें घ्यावी. सामवेदी यांनीं विकल्पेंकरून दोनाहि घ्याव्या. जेव्हां पूर्वदिवसीं अपराण्हकालीं अधिक व्याप्ति व दुसऱ्या दिवसी अल्प व्याप्ति असेल, तेव्हां सामवेदी यांनीं पूर्वीची, आणि तैत्तिरीयशाखी यांनीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोनाहि दिवसीं अपराण्हकालीं नसेल तर सामवेदी यांनीं पूर्वीची घ्यावी, व तैत्तिरीयशाखी यांनीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी, असें सांगितलें. अमावास्येचे दिवसीं दर्शश्राद्ध व वर्षश्राद्ध, किंवा दर्श व मासिकश्राद्ध, अथवा दर्शश्राद्ध व उदककुंभश्राद्ध असीं दोन दोन आलीं तर देवताभेदेंकरून दोन श्राद्धें करावीं. त्यामध्यें प्रथम मासिक किंवा वर्षश्राद्ध करून नंतर दुसऱ्या पाकानें दर्शश्राद्ध करावें. वैश्वदेव करणें तो, वर्षश्राद्धादिक करून जें श्राद्धशेष अन्न असेल त्याणें अथवा निराळा भात करून त्याणें दर्शश्राद्धाच्या पूर्वी करावा. अग्निहोत्र्यानें वैश्वदेव, पिंडपितृयज्ञ, हीं करून नंतर वर्षश्राद्धादिक करावें. मौंजी न झालेला, ज्याची पत्नी मृत झाली आहे तो, व प्रवासी, यांनीं ही दर्शश्राद्ध करावें. दर्शश्राद्धाचा अतिक्रम होईल तर "न्यूषुवाचं" या ऋचेचा शंभरवेळ जप करावा. याप्रकारें करून दर्शनिर्णय झाला. उद्देश ॥ २४ ॥

## इष्टि आणि स्थालीपाक यांच्या आरंभाचा निर्णय.

इष्टि आणि स्थालीपाक यांचा आरंभ पौर्णिमेच्या दिवसीं करावा, अमावास्येच्या दिवसीं करूं नये. अग्निस्थापना करणें ती गृहप्रवेशनीय होम झाल्यानंतरच करावी. दर्शपौर्णमासाचा आरंभ जर पौर्णिमेचे ठिकाणीं कर्तव्य असेल तर त्याविषयीं मलमास, पौषमास, शुक्रांचीं अस्तादिक, यांचा दोष नाहीं. पौर्णिमेचे दिवसीं आरंभ न होईल तर शुद्ध मासादिकांची प्रतीक्षा करावी असें कितीएक ग्रंथकार सांगतात. सर्वदा शुद्ध कालींच आरंभ करावा असें दुसरे ग्रंथकार सांगतात. ॥ याप्रकारें इष्टयादि प्रारंभाचा निर्णय झाला. उद्देश ॥ २५ ॥

## आतां विकृतींचा काल.

विकृति तीन प्रकारच्या आहेत—आग्रयण, चातुर्मास्यें इत्यादिक ज्या विकृति त्या नित्य होत. जातेष्टि इत्यादिक ज्या त्या नैमित्तिक. सौरी इत्यादिक त्या काम्य. ह्या विकृति पुरुषार्थाचीं कर्में होत. याप्रमाणें यज्ञाच्या अंगभूत ज्या विकृति त्याहि दोन

प्रकारच्या आहेत—नित्य, आणि नैमित्तिक. ह्या विकृति तत्काळीं कराव्या, किंवा दोन दिवस कराव्या याविषयीं विकल्प आहे. याप्रमाणें पर्वदिवशीं अथवा शुक्लपक्षांतील जीं देवनक्षत्रें त्यांचे ठिकाणीं करावा, असा विकल्प आहे, त्यांमध्यें पर्वदिवशीं कर्तव्य असून अपराण्हादि संधि असेल तर संधिदिवशीं तात्काल किंवा दोन दिवसांचा काळ आहे त्रीस असी विकृती करून प्रकृतीचें अन्वाधान करावें. मध्यान्हसंधि अथवा पूर्वाण्हसंधि असेल तर संधिदिवशीं प्रकृति समाप्त करून तात्कालिक अशीच विकृति करावी. कृत्तिकांपासून विशाखांपर्यंत जीं चवदा नक्षत्रें त्यांस देवनक्षत्रें ह्मणतात. आग्रयणाचा विशेष निर्णय द्वितीयपरिच्छेदामध्यें सांगेन. अन्वारंभणीय इष्टि चतुर्दशीचे दिवशीं करावी. ॥ यामभाणें विकृतिसामान्यनिर्णयझाला. उद्देश ॥ २६ ॥

# पशुयागाचा काल.

पशुयाग तर वर्षाऋतूमध्यें श्रावणी इत्यादिक जीं चार पर्वें त्यांतून कोणत्यातरी एका पर्वणीचे ठायीं दक्षिणायन दिवशीं किंवा उत्तरायण दिवशीं करावा. ह्याविषयीं खंडित पर्व असेल तर विकृतीविषयीं जो सामान्य निर्णय सांगितला तोच जाणावा. ॥ याप्रमाणें पशुयागाचा उद्देश झाला. २७ ॥

# आतां चातुर्मास्यांचा काल.

चातुर्मास्याच्या प्रयोगाचे चार पक्ष आहेत. ते असे—फाल्गुनी पौर्णिमा, किंवा चैत्री पौर्णिमा, यांतून कोणत्याहि पौर्णिमेचे दिवशीं वैश्वदेव पर्व करून आषाढी इत्यादिक पौर्णिमेचे दिवशीं पर्वाला आरंभ करून चार चार महिन्यांनीं पौर्णिमेचे दिवशीं एकेक पर्व करावें, असें यावज्जीव अनुष्ठान करणें हा यावज्जीवपक्ष; पूर्वीं सांगितल्या रीतीनें एक वर्षपर्यंत अनुष्ठान करून नंतर सवनेष्टि, पशुयाग, किंवा सोमयाग यांतून कोणतेंहि एक करून समाप्ति करणें तो सांवत्सरपक्ष; प्रथम दिवशीं वैश्वदेव पर्व, चवथ्या दिवशीं वरुणप्रघास पर्व, आठवा व नववा ह्या दिवशीं साकमेध पर्व, बाराव्या दिवशीं शुनासीरीय पर्व, असा हा द्वादशाहपक्ष; पांच दिवसपर्यंत करून पांचव्या दिवशीं समाप्ति करणें तो **यथाप्रयोगपक्ष**. द्वादशाहपक्ष आणि यथाप्रयोगपक्ष यांचा आरंभ उत्तरायणांत शुक्लपक्षीं व देवनक्षत्रीं करून शुक्लपक्षांतच समाप्ति करावी असें पुष्कळ ग्रंथकार ह्मणतात; अथवा कृष्णपक्षांत समाप्ति करावी असेंहि कितीएक ह्मणतात. बारा दिवसांचा पक्ष व पांच दिवसांचा पक्ष ह्या दोन पक्षांची समाप्ति सवनेष्टि इत्यादिकांतून एकानें केली तर ते दोन पक्ष एकवेळ करावे. तसी समाप्ति न केली तर दरएक वर्षीं करावें. क्वचित् ग्रंथांत एक

दिवसांच्या पक्षाचाहि प्रयोग सांगितला आहे, तो प्रयोग, चैत्री इत्यादिक चार पौर्णिमेतून कोणत्या एका पौर्णिमेचे दिवशीं होतो. क्वचित् ग्रंथांत सात दिवसांचाहि पक्ष सांगितला आहे. तो असा: — दोन दिवस वैश्वदेव पर्व, तिसऱ्या दिवशीं वरुणप्रघास पर्व, चवथ्या दिवशीं गृहमेधीया, पांचव्या दिवशीं महाहवीषि, साहाव्या दिवशीं पितृयज्ञादिक साकमेधपर्वाचा शेष, सातव्या दिवशीं शुनासीरीय पर्व. या सात दिवसांच्या पक्षाविषयीं पांच दिवसांच्या पक्षाला सांगितलेला शुक्लपक्षादिक काळ घ्यावा. " याप्रकारें करून चातुर्मास्य कालाचा निर्णय झाला. उद्देश ॥ २८ ॥

# काम्येष्टीचा काल.

काम्येष्टि, विकृतीला जो सामान्य निर्णय सांगितला त्याप्रमाणें पर्वदिवशीं कराव्या, अथवा शुक्लपक्षांतील देवतानक्षत्रीं कराव्या. स्त्री प्रसूत झाली असतां जातेष्टि करावी; परंतु वीस दिवसपर्यंत कर्माचा प्रतिबंध करणारें जें जननाशौच तें गेल्यानंतर पर्वदिवशीं करावी. घर दग्ध होईल तर गृहदाहेष्टि करावी असें सांगितलें आहे, यास्तव तसें निमित्त प्राप्त झाल्यानंतर गृहदाहेष्टि इत्यादिक नैमित्तिक इष्टि कर्तव्य असतील तर पर्वादिकांची गरज नाहीं. तसें निमित्त नसेल तर पर्वदिवशीं कराव्या. यज्ञाच्या अंगभूत ज्या नित्य इष्टि त्या यज्ञाबरोबरच कराव्या, त्यांविषयीं निराळ्या कालाची गरज नाहीं. "होम करण्याचीं द्रव्यें दोषयुक्त झालीं" इत्यादि दोषांच्या निमित्तानें प्राप्त झालेल्या ज्या यज्ञाच्या अंगभूत इष्टि त्या आपल्या स्विष्टकृत्कर्माच्या नंतर व समष्टि संज्ञक होमाच्या पूर्वीं दोषस्मरण झालें असतां त्या वेळींच त्याच विधीच्या अनुरोधानें निर्वापादिक कराव्या. प्रायश्चित्ताच्या आहुतीनंतर दोषस्मरण होईल तर तो सर्व प्रयोग समाप्त करून पुन: अन्वाधानादिक विधीनें कराव्या याप्रकारेंकरून काम्य नैमित्तादि इष्टींचा निर्णय झाला. उद्देश ॥ २९ ॥

# आधानाचा काल.

आधान पर्वदिवशीं आणि उक्त नक्षत्रीं करावें. त्याविषयीं पर्व घेणें तें संकल्पापासून पूर्णाहुतीपर्यंत सर्व प्रयोग त्या कालांत होई इतकें घ्यावें. तितकें घेण्यासारखें नसेल तर गार्हपत्याधानापासून आहवनीयाधानापर्यंत पुरेल इतकें विद्यमान असेल तें घ्यावें. याप्रमाणें नक्षत्राचाहि निर्णय जाणावा. संकल्पादिक संपूर्ण कर्म होईल इतकें पर्व दोन दिवशीं असेल तर ज्या दिवशीं सांगितलेल्या नक्षत्राचा योग असेल तें ग्रहण करावें. वसंतऋतु, पर्व, आणि सांगितलेलीं नक्षत्रें, या तिहींचा एककालीं योग येईल तर अति उत्तम. पर्व व नक्षत्र हीं असून ऋतु नसेल तर मध्यम. नुस्तें नक्षत्र किंवा नुस्तें पर्व हें अधम होय. कृत्तिका, रोहिणी, विशाखा, पूर्वाफाल्गुनी, उत्तराफल्गुनी, मृग, उत्तराभा

द्रपदा असीं सात नक्षत्रें आश्वलायनसूत्रांत सांगितलीं आहेत. कृत्तिका, रोहिणी, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, मृग, पुनर्वसू, पुष्य, पूर्वाफाल्गुनी, पूर्वाषाढा, हस्त, चित्रा, विशाखा, अनुराधा, श्रवण, ज्येष्ठा, रेवती, असीं सतरा नक्षत्रें दुसऱ्या सूत्रांत सांगितलीं आहेत. सोमपूर्वक आधान असेल तर, "ऋतु, नक्षत्रें यांचा विचार करूं नये" असें वचन आहे, यास्तव सोमकालाच्याच अनुरोधानें आधान केल्यास येथें निराळ्या कालाचा विचार करण्याची गरज नाहीं. "या प्रकारें करून आधानाचा काल सांगितला. उद्देश ३० ॥

# आतां ग्रहणाचा निर्णय.

चंद्र, किंवा सूर्य यांचें ग्रहण डोळ्यांनीं दिसत असेल तेथपर्यंत पुण्यकाल, याकरितां ग्रहण लागून ग्रस्त झाल्यानें अन्यद्वीपीं ग्रहण असेल तथापि दिसण्यास योग्य नाहीं याकरितां पुण्यकाल नाहीं. असेंच ग्रहण लागून नंतर उदय होईल तर उदयाच्या पूर्वी पुण्यकाल नाहीं. अभ्र, इत्यादिं अडचणीमुळें दिसण्याचा असंभव असेल तर शास्त्रादिकांपासून स्पर्शकाल व मोक्षकाल हे जाणून स्नान, दान, इत्यादिक करावें. रविवारीं सूर्यग्रहण व सोमवारीं चंद्रग्रहण असें ग्रहण असेल तर तें **चूडामणि** ग्रहण, त्याचे ठिकाणीं दानादिक केलें असतां अनंत फल होतें. ग्रहणाच्या स्पर्शकालीं स्नान; मध्यें होम, देवपूजा, श्राद्ध; सुटण्यास आरंभ झाल्यावर दान; निःशेष सुटल्यानंतर स्नान; याप्रमाणें क्रम जाणावा. स्नानाच्या उदकाविषयीं तारतम्य — "उष्णोदकाहून शीतोदक पुण्यकारक, दुसऱ्यानें दिलेल्या उदकाहून स्वतांचें उदक पुण्यकारक, वर उदक काढून स्नान करणें त्याहून उदकांत बुडी मारून स्नान करणें पुण्यकारक, त्याहून वाहतें उदक पुण्यकारक, वाहत्याहून सरोवराचेंजल पुण्यकारक, त्याहून नदीचें जल पुण्यकारक, याप्रमाणें तीर्थें, नदी, गंगा, समुद्र यांचें स्नान उत्तरोत्तर पुण्यकारक आहे." ग्रहणांत वस्त्रासह स्नान करावें. वस्त्रासह स्नान करणें तें मुक्तिस्नानपर असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. मुक्तिस्नान न केलें असतां सुतकीपणा जात नाहीं. ग्रहणाचें स्नान अमंत्रण करावें. सुवासिनी स्त्रियांनीं गळ्याखालीं स्नान करावें. शिष्टांच्या स्त्रिया ग्रहणांत डोकीवरून स्नान करितात. सुव्हेर आणि सुतक यांमध्यें ग्रहणसंबंधी स्नान, दान, श्राद्धादिक आवश्य करावें.

# ग्रहणांतील रजस्वलेच्या नैमित्तिक स्नानाचा विचार.

"स्त्री रजस्वला असेल, आणि कांहीं नैमित्तिक स्नान प्राप्त होईल तर, भांड्यांत

उदक घेऊन त्याणें स्नान करून व्रत करावें.. वस्त्र पिळूं नये, व दुसरें वस्त्र नेसूं नये." तीन दिवस किंवा एक दिवस उपोषण करून ग्रहणाचें स्नान, दान इत्यादिक केलें असतां मोठें फल प्राप्त होतें. एक दिवस उपोषण करणें असेल तर ग्रहणादिवसाच्या पूर्व दिवशीं उपोषण करावें, असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. ग्रहण संबंधी अहोरात्रीं उपोषण करावें,असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. पुत्रवान् गृहस्थाश्रमी यांनीं ग्रहण, संक्रांति, इत्यादिक दिवशीं उपोषण करूं नये. पुत्रवान् अशा शब्देंकरून. कन्यावान् असतील त्यांनींहि उपोषण करूं नये. ग्रहणाचे ठिकाणीं देव, पितर, यांचें तर्पण करावें, असें कोणी ह्मणतात. "सर्व वर्णांला ग्रहणाचें सुतक आहे." याकरितां ग्रहणकालीं स्पर्श केलेलीं अशीं जीं वस्त्रादिक त्यांची शुद्धि उदकानें धुवून करावी. धुण्यासारखीं नसतील तर दर्भादिकानें उदकाचें प्रोक्षण करून शुद्धि करावी.

## दानाविषयीं पात्रापात्र विचार.

ग्रहणांत गाई, भूमि, सुवर्ण, धान्य, इत्यादिकांचें दान केलें असतां मोठें फल आहे. तपश्चर्या, व विद्या या दोहोंनीं संपन्न जो ब्राह्मण तो मुख्य दानपात्र. सत्पात्रीं दान केल्यानें मोठें पुण्य आहे. "चंद्रसूर्यांच्या ग्रहणकालीं सर्व उदक गंगेच्या समान, सर्व ब्राह्मण व्यासाच्या समान,सर्व दान भूमिदानाच्या समान" असें जें वचन तें सामान्य पुण्याच्या अभिप्रायाचें आहे. वास्तव "अब्राह्मणाचे ठिकाणीं दान समफल, ब्राह्मण ब्रुवाचे ठिकाणीं द्विगुणफल, श्रोत्रियाचे ठिकाणीं शंभर सहस्रपट, सत्पात्राचे ठिकाणीं अनंतफल," असें तारतम्य सांगितलें.—मौंजी, वेदादिक, यांचा संस्कार ज्याला नाहीं, व जातीनें मात्र ब्राह्मण तो अब्राह्मण, त्याला दान केलें तर सांगितलें इतकेंच फल मिळतें. गर्भाधानादि संस्कार झालेला, व वेद पाठ करणें,दुसऱ्यास शिकविणें, यांही जो हीन तो ब्राह्मणब्रुव, त्याला दान केलें तर दुप्पट फल मिळतें. वेद स्वतां पाठ करणें व दुसऱ्यास शिकविणें, यांहींकरून युक्त तो श्रोत्रिय, त्याला दान केलें तर सहस्रपट फल मिळतें. विद्या, उत्तम आचार, इत्यादिकांनीं युक्त तो सत्पात्र, त्याला दान केलें तर अनंतफल; याप्रमाणें वाक्याचा अर्थ जाणावा. ग्रहणांत श्राद्ध करणें तें आमान्नें करून करावें, किंवा हिरण्य श्राद्ध करावें. संपत्तिमान् असेल तर पक्वान्नेंकरून करावें, सूर्यग्रहणीं श्राद्ध करावयाचें ते तीर्थयात्रांगश्राद्धाप्रमाणें घृतप्रधान अशा अन्नानें करावें. ग्रहणांत श्राद्धभोजन करणारा महादोषी होतो. संपत्तिमान् असेल त्यानें ग्रहणांत तुलादानादिक करावें.

## ग्रहणांत मंत्रदीक्षा घेण्याचा प्रकार.

"चंद्र आणि सूर्य यांच्या ग्रहणीं,तीर्थाचे ठिकाणीं,महापर्व इत्यादिकालीं,मंत्राची दीक्षा

घेणें असेल तर महिना, नक्षत्र, इत्यादि शुद्धीची गरज नाहीं. मंत्रदीक्षा घेण्याचा प्रकार तंत्रग्रंथीं पाहावा. दीक्षाशब्दाचें ग्रहण उपदेशाचें उपलक्षण करितें. " युगायुगाचे ठिकाणीं दीक्षा होते आणि कलियुगीं उपदेश होतो. चंद्रसूर्यग्रहण, सिद्धक्षेत्र शिवालय, इत्यादि स्थानीं नुस्ता मंत्र मात्र सांगणें तो उपदेश होय. मंत्र घेण्याविषयीं सूर्यग्रहणच मुख्य आहे. चंद्रग्रहणीं मंत्रग्रहण केलें असतां दारिद्र इत्यादिक दोष प्राप्त होतो असें कितीएक ह्मणतात. " चंद्रसूर्यांच्या ग्रहणीं उपोषणपूर्वक स्नान करून स्पर्श कालापासून सुटे पर्यंत एकाग्रमनानें मंत्राचा जप करावा, जपाचा दशांश होम करावा, होमाचा दशांश तर्पण करावें. होमाविषयीं शक्ति नसेल तर होमसंख्येच्या चौपट जप करावा. " मूल मंत्राचा उच्चार करून त्याच्या शेवटीं द्वितीया विभक्त्यंत असा, मंत्रदेवतेच्या नामाचा उच्चार करून अमुक देवतेला मी तर्पण करितों असा उच्चार करून पत्रादिक घातलेलें असें जें उदक त्याच्या अंजलींनीं तर्पण, होमाच्या दशांशेंकरून करावें. असा नमोंत मूलमंत्र उच्चार करून अमुक देवतेला मी अभिषेक करितों, असें उच्चारून तर्पणाच्या उदकानें आपल्या मस्तकीं अभिषेक करावा. याप्रमाणे मार्जन, तर्पणाच्या दशांश करावें. मार्जनाच्या दशांशेंकरून ब्राह्मण भोजन करावें. याप्रकारेंकरून जप, होम, तर्पण, मार्जन, आणि ब्राह्मणभोजन, हें पांच प्रकारचें पुरश्चरण होय. तर्पणादि करण्यास सामर्थ्य नसेल तर त्या त्या संख्येच्या चौपट जपच करावा. मंत्राचें पुरश्चरण करावयाचें तें स्पर्श होऊन उदय पावलेलें आणि सुटल्यावांचुन अस्त झालेलें अशा ग्रहणीं होत नाहीं. पुरश्चरण संबंधी उपवास पुत्रवान्गृहस्थाश्रमी यांनींहि करावा. पुरश्चरण करील आणि त्याचे स्नानदानादि नैमित्तिक कर्माचा लोप होईल तर दोषप्रसंग प्राप्त होतो, यास्तव नैमित्तिक जें स्नानदानादिक तें स्त्री, पुत्र, इत्यादि प्रतिनिधीं कडून करावें.

## पुरश्चरणाचा विधि

स्पर्शकालाच्या पूर्वीं स्नान करून "अमुकगोत्रोऽमुकशर्माहं राहुग्रस्ते दिवाकरे निशाकरे वा अमुकदेवताया अमुकमंत्रसिद्धिकामो ग्रासादिमुक्तिपर्यंतं अमुकमंत्रस्य जपरूपं पुरश्चरणं करिष्ये" असा संकल्प करून आसनविधि, न्यास इत्यादिक स्पर्शाच्या पूर्वींच करून ग्रहण लागल्यापासून सुटेपर्यंत मूलमंत्राचा जप करावा. नंतर दुसऱ्या दिवशीं स्नानादिक नित्यकर्म करून, "अमुकमंत्रस्य कृतैतद्ग्रहणकालिकामुकसंख्याकपुरश्चरण जपसांगतार्थं तद्दशांशहोम, तद्दशांशतर्पण, तद्दशांशमार्जन 'तद्दशांशब्राह्मणभोजनानि

करिष्ये, " असा संकल्प करून होमादिक किंवा त्याच्या त्याच्या चौपट, अथवा दुप्प ट यांतून कोणत्या एका संख्येने जप करावा. ग्रहणकालीं पुरश्चरणकर्त्यानें आपल्या पुत्रादिकांला आपलें स्नानादिक करण्याविषयीं आज्ञा केल्यानंतर पुत्रादिकानें, "अमुक शर्मणोऽमुकगोत्रस्यामुकग्रहणस्पर्शस्नानजनितश्रेयःप्राप्त्यर्थं स्पर्शस्नानं करिष्ये, " असा संकल्प करून त्याचीं स्नान, दान इत्यादिक कर्मे करावीं. पुरश्चरण न करणारे अशा नींहि गुरूनें सांगितलेल्या अशा मंत्राचा आणि आपापल्या इष्टदेवतेच्या मंत्राचा जप आणि गायत्रीचा जप ग्रहणांत अवश्य करावा. न करतील तर मंत्राला मलीनपणा येतो. ग्रहणाच्या समयीं निद्रा केली तर रोग, मुत्रोत्सर्ग केला तर दारिद्र, शौचाला गेलें तर कृमि होतो, मैथुन केलें तर गांवडुकर, तैलाभ्यंग केला तर कुष्टरोग, भोजन केलें तर नरक इत्यादि दुष्ट फळें होतात. पूर्वी शिजवलेलें अन्नावरून ग्रहण गेलें असतां तें टाकावें. याप्रमाणे ग्रहणांतील उदक प्राशन केलें असतां पादकृच्छ्र प्रायश्चित करण्यास सांगितलें आहे यास्तव ग्रहणसंबंधी उदकहि टाकावें. कांजी, ताक, तूप,तेल यांत तळलेले पदार्थ व दूध, हे पूर्वी तयार केलेले सर्व पदार्थ ग्रहणानंतर घ्यावे. तूप, लोणचीं, गोरस, यांचे ठिकाणीं ग्रहणामध्यें दर्भ घालावे.

# आतां ग्रहणाच्या वेधाचा विचार.

सूर्यग्रहणीं ग्रहणप्रहराच्या पूर्वी चार प्रहर वेध. चंद्रग्रहणीं ग्रहणप्रहराच्या पूर्वी तीन प्रहर वेध. तसेंच, दिवसाच्या पहिल्या प्रहरीं सूर्यग्रहण होईल तर पूर्वरात्रीच्या चार प्रहरांत भोजन करूं नये. दुसऱ्या प्रहरीं ग्रहण होईल तर पूर्वरात्रीच्या दुसऱ्या प्रहरापासून भोजन करूं नये. तसेंच पहिल्या प्रहरीं चंद्रग्रहण होईल तर दिवसाच्या दुसऱ्या प्रहरापासून भोजन करूं नये. रात्रीच्या दुसऱ्या प्रहरीं ग्रहण होईल तर दिवसाच्या तिसऱ्या प्रहरापासून भोजन करूं नये. बाल, वृद्ध, रोगी यांविषयीं दीडप्रहर किंवा सहा घटिका वेध. सशक्तानें वेधकालीं भोजन केलें असतां तीन दिवस उपोषण करावें, हें प्रायश्चित. ग्रहणकालीं भोजन केलें असतां प्राजापत्य प्रायश्चित करावें. ग्रहण लागून चंद्राचा उदय होईल तर चार प्रहर वेध, याकरितां दिवसा भोजन करूं नये. कोणी ग्रंथकार चंद्राचा पूर्ण ग्रास असेल तर चार प्रहर वेध, आणि एकदेशग्रास असेल तर तीन प्रहर वेध असें ह्मणतात. ग्रहण असून अस्त होईल तर " ग्रहण असून चंद्र सूर्य अस्त पावतील तर दुसऱ्या दिवसीं उदयकालीं स्नान करून पुरुष शुद्ध होतो." एथे स्नान करून शुद्ध अशा वचनानें, शुद्ध मंडळाचे दर्शनकालीं जे स्नान त्याच्या पूर्वी शुद्धि नाहीं असें सांगितलें, यास्तव उदक आणणें, स्वयंपाक करणें, इत्यादिक शुद्ध

बिंबाचा उदय होऊन स्नान केल्याच्या पूर्वी करूं नये असें वाटतें. सूर्यग्रहण ग्रस्तास्त किंवा ग्रस्तोदय असेल तर पुत्रवान् अशा गृहस्थाश्रमीला उपोषणाचा निषेध सांगितला आहे यास्तव बारा घटिका वेध टाकून ग्रहणाच्या पूर्वी भोजन करावें असें कोणी ह्मणतात. पुत्रवान् अशा गृहस्थाश्रमींनींहि तशा ग्रहणीं उपोषणच करावें, असें माधवाचेंच मत शिष्टाचाराला मिळतें असें योग्य आहे.

# ग्रहण असतां नैमित्तिक कर्मांचा विचार.

सूर्यग्रहण ग्रस्तास्त असेल आणि चंद्रग्रहण ग्रस्तोदय असेल तर अग्निहोत्र्यानें अन्वाधान करून जलानें व्रत करावें, भोजन करूं नये. चंद्रग्रहण ग्रस्तास्त असेल तर दुसऱ्या दिवसीं संध्या, होम इत्यादि करण्याविषयीं दोष नाहीं. अल्पवेळानें ग्रहण सुटेल असा शास्त्रेंकरून सुटण्याचा निश्चय होईल तर सुटण्याच्या वेळेनंतर स्नान करून होमादिक कर्म करावें. फार वेळानें सुटणारें असें असेल तर होमकालाचें उल्लंघन होतें याकरितां ग्रस्तोदयासारखें ग्रहणामध्येंच संध्या, होम करून शास्त्रेंकरून सुटण्याचा जो काळ असेल त्या कालीं स्नान करून ब्रह्मयज्ञ इत्यादिक नित्य कर्म करावें, असें वाटतें. अमावास्येचे दिवसीं ग्रहणसंबंधीं श्राद्ध केल्यानेंच दर्शश्राद्ध, आणि संक्रांतिश्राद्धें, यांची सिद्धि होये. ग्रहणाच्या दिवसीं पिता इत्यादिकांचें वार्षिक श्राद्ध आलें असतां संभव असेल तर अन्नानें करावें. ब्राह्मणादिक न मिळाल्यामुळें असंभव असेल तर आमान्नें करून किंवा हिरण्यें करून करावें.

# अनिष्ट ग्रहणाची शांति व बिंबदान.

आपल्या जन्मराशीपासून तृतीय, षष्ठ, एकादश, दशम, या राशींचे ठिकाणीं ग्रहण शुभ होय. द्वितीय, सप्तम, नवम, पंचम या स्थानीं मध्यम होय. आद्य, चतुर्थ, अष्टम, द्वादश या राशींचे ठिकाणीं अशुभ होय. ज्याच्या जन्मराशीं किंवा जन्मनक्षत्रीं ग्रहण होतें त्यास विशेष अनिष्टकारक होतें याकरितां त्यानें गर्गादिकांनीं सांगितलेली शांति करावी. अथवा बिंबदान करावें. तें असें—चंद्रग्रहणीं रुप्याचें चंद्रबिंब, आणि सुवर्णाचें नागबिंब करावें. सूर्यग्रहणीं सुवर्णाचें सूर्यबिंब, व नागबिंब करून तें, तुपानें भरलेलें असें तद्व्याचे पात्र अथवा कांस्यपात्र यांत ठेवून, तिल, वस्त्र, दक्षिणा, इतकी सामग्री तयार करून "ममजन्मराशिजन्मनक्षत्रस्थितामुकग्रहणसूचितसर्वानिष्टप्रशांतिपूर्वकं एकादशस्थानस्थितग्रहणसूचितशुभफलावाप्तये बिंबदानं करिष्ये." असा संकल्प करून चंद्र, सूर्य, राहु, यांचे ध्यान आणि नमस्कार करून नंतर, "तमोमयमहाभीम

सोमसूर्यविमर्दन ॥ हेमतारप्रदानेन ममशांतिप्रदोभव ॥ विधुंतुदनमस्तुभ्यं सिंहिकानंदनाच्युत दानेनानेन नागस्य रक्षमांवेधजाद्भयात्, " असा मंत्रोच्चार करून "इदं सौवर्ण राहुबिंबं नागं सौवर्णं रविबिंबं राजतं चंद्रबिंबं वा घृतपूर्णकांस्यपात्रनिहितं यथाशक्ति तिलवस्त्रदक्षिणा सहितं ग्रहणसूचितारिष्टविनाशार्थं शुभफलप्राप्त्यर्थंच तुभ्यमहं संप्रददे. " या दानवाक्याने पूर्वी पूजा केलेला असा जो ब्राह्मण त्याला दान करावें. असेंच चतुर्थ इत्यादि अनिष्ट स्थानीं ग्रहण असेल तर दान करावें, असें वाटतें. ज्याच्या जन्मराशी, जन्मनक्षत्र इत्यादि स्थानीं ग्रहण असेल त्यानें राहूनें ग्रस्त असें सूर्यचंद्राचें बिंब पाहूं नये. अन्य लोकांनींहि वस्त्र, उदक इत्यादि आड करून त्यांतून ग्रहण पाहावें; प्रत्यक्ष पाहूं नये.

## मंगल कार्याविषयीं वर्ज्य असे ग्रहण संबंधीं दिवस.

पूर्णग्रास असें चंद्रग्रहण असेल तर मंगलकार्याचे ठिकाणीं, द्वादशीपासून तृतीयेपर्यंत सात दिवस टाकावे. पूर्णग्रास असें सूर्यग्रहण असेल तर एकादशीपासून चतुर्थीपर्यंत नऊ दिवस टाकावे. खंडित ग्रहण असेल तर चतुर्दशीपासून तीन दिवस टाकावे. ग्रासाचे चरण जसे कमजास्ती होतील त्या मानानें दिवसांचेंहि कमजास्ती मान योजावें, असें ज्योतीष ग्रंथामध्यें सांगितलें आहे. ग्रस्तास्त असेल तर पूर्वीचे तीन दिवस टाकावे. ग्रस्तोदय असेल तर पुढचे तीन दिवस टाकावे. पूर्ण ग्रास असेल तर सहा महिनेपर्यंत ज्या नक्षत्रीं ग्रहण असेल तें नक्षत्र वर्ज्य करावें. पादादिग्रास जसा जसा होईल त्या त्या मानानें दीड महिना इत्यादि वर्ज्य करावें. संकल्प करून द्यावयास काढलेलें द्रव्य ग्रहणानंतर दिलें असतां दुप्पट होतें. ॥ याप्रकारें करून ग्रहणाचा निर्णय झाला. उद्देश ३१ ॥

## समुद्रस्नानाचा विचार.

पौर्णिमा, अमावास्या, इत्यादि पर्वणीचे दिवसीं समुद्रस्नान करावें. शुक्रवार आणि मंगळवार या दिवसीं समुद्राचें स्नान करूं नये. " अश्वत्थ, व सागर, यांची सेवा करावी. त्यांना कधींहि स्पर्श करूं नये, शनिवारीं अश्वत्थाला स्पर्श करावा व पर्वणीचे दिवसीं समुद्राला स्पर्श करावा. सेतुबंधसंबंधीं जें समुद्राचें स्नान त्या विषयीं कोणताही निषेध नाहीं." समुद्रस्नानाचा प्रयोग दुसऱ्या ग्रंथीं पहावा. ॥ या प्रकारें करून समुद्रस्नानाचा निर्णय झाला. उद्देश ३२ ॥

# कोणकोणत्या तिथि, नक्षत्रें आणि वार, यांचे ठिकाणीं कोणकोणते पदार्थ वर्ज्य ते सांगतों.

तैलस्पर्श, काळें वस्त्र धारण करणें, आंबळकठीच्या काष्ठानें स्नान, कलह, तांब्याचे भांड्यांत भोजन करणें, हीं सप्तमीचे दिवसीं वर्ज्य करावीं. प्रतिपदा, षष्ठी, एकादशी या दिवसीं तैलाभ्यंग वर्ज्य. चतुर्थी, नवमी, चतुर्दशी या दिवसीं क्षौर वर्ज्य. तृतीया, अष्टमी, त्रयोदशी, या दिवसीं शूद्रादिकांनीं मांस वर्ज्य करावें. पंचमी, दशमी, पौर्णिमा या दिवसीं स्त्री वर्ज्य. रविवार, मंगळवार, बुधवार या दिवसीं क्रमेंकरून तैलाभ्यंग, श्मश्रु, स्त्री, हीं वर्ज्य. चित्रा, हस्त, श्रवण या नक्षत्रीं स्त्री वर्ज्य. विशाखा, प्रतिपदा या दिवसीं श्मश्रु वर्ज्य. मघा, कृत्तिका, तीन उत्तरा, या नक्षत्रीं स्त्री वर्ज्य. तिलभक्षण तिलतर्पण हीं सप्तमीस वर्ज्य. अष्टमी, नवमी, दशमी, एकादशी, द्वादशी, त्रयोदशी, या दिवसीं क्रमेंकरून नारळ, भोपळा, पडवळ, पावटा वगैरे, मसुरा, वांगीं हीं वर्ज्य करावीं. "पूर्णिमा, अमावास्या, संक्रांति, चतुर्दशी, अष्टमी, या दिवसीं तैल, स्त्री, मांस हीं सेवन करील तर त्याला चांडालजन्म होतें." पूर्णिमा, अमावास्या, संक्रांति, द्वादशी, श्राद्धदिवस, या दिवसीं वस्त्र पिळूं नये. रात्रीं माती, शेण, उदक, हीं आणूं नयेत. गोमूत्र प्रदोषकाळीं आणूं नये. आमावास्या इत्यादि पर्वणीचे दिवसीं शांतीकरितां अवश्य तिळांचा होम करावा. आपल्या रक्षणाकरितां दानादिक करावीं. पर्वणीचे दिवसीं अध्ययन करूं नये. शौच, आचमन, ब्रह्मचर्य हीं सेवन करावीं. प्रतिपदा, अमावास्या, षष्ठी, नवमी, श्राद्धदिवस, जन्मदिवस, व्रतदिवस, उपोषणादिवस, रविवार, माध्यान्हस्नानसमय, इतक्या काळीं काष्ठानें दांत घांसूं नये. "ज्या दिवसीं दंतकाष्ठें न मिळतील त्या दिवसीं आणि निषिद्ध दिवसीं उदकाचे बारा चूळ करून किंवा वृक्षाच्या पानांनीं मुखप्रक्षालन करावें." या सर्व निषेधांविषयीं तिथी, नक्षत्रें इत्यादि घेणें तीं तत्काळव्यापी असतील तीं घ्यावी.

॥ याप्रकारें करून धर्मसिंधुसारांतील तिथ्यादिकांचा विधिनिषेध सांगितला उद्देश ॥३३॥

मीमांसाधर्मशास्त्रज्ञाःसुधियोनलसाबुधाः ॥ कृतकार्याःप्राङ्निबंधैस्तदर्थनायमुद्यमः ॥१॥

मीमांसा, धर्मशास्त्र यांतें जाणणारे व बुद्धिमान, आलस्यरहित असे जे पंडित ते महाविद्वानांनीं केलेले पूर्वींचे ग्रंथ पाहून त्यांवरून कृतकार्य होतात, याकरितां माझा हा ग्रंथ करण्याचा उद्योग त्यांच्याकरितां नाहीं:

येपुनर्मंदमतयोलसाअज्ञाश्चनिर्णयं धर्मंवेदितुमिच्छंतिरचितस्तदपेक्षया ॥ २ ॥

निबंधोयंधर्मसिंधुसारनामासुबोधनः अमुनाप्रीयतांश्रीमद्विठ्ठलोभक्तवत्सलः ॥ ३ ॥

तर जे मंदबुद्धि, आळसी, अविद्वान असे असून धर्मविषयीं निर्णय जाणण्याची इच्छा करितात त्यांच्या करितां धर्मसिंधुसार नांवाचा असा हा सुबोध ग्रंथ मी केला आहे- या ग्रंथेंकरून भक्तवत्सल असा श्रीमद्विठ्ठल संतुष्ट असो.

सर्वत्रमूलवचनानीहज्ञेयानितद्विचारश्च कौस्तुभनिर्णयसिंधुश्रीमाधवकृतनिबंधेभ्यः ॥४॥

या ग्रंथाविषयींचीं सर्व मूलवचनें व त्यांचे विचार पाहाणें असतील तर कौस्तुभ, निर्णयसिंधु, श्रीमाधव यांणीं केलेले जे निबंध त्यांत पाहवे.

प्रेम्णासाद्भिर्ग्रंथःसेव्यःशब्दार्थतःसदोषोपि संशोध्यवापिहरिणासुदाममुनिसतुषपृथुकमुष्टिरिव ॥ ५ ॥

हा ग्रंथ क्वचित् स्थलीं शब्दार्थानें सदोष असला तथापि विद्वानांनीं विचारपूर्वक शोधून ग्रहण करण्यास योग्य आहे. ज्याप्रमाणें सुदामा ब्राह्मणाचे पोहे कोंड्यानें युक्त असतांहि ते हरीनें कोंडा टाकून देऊन भक्षण केले. ॥ या प्रकारेंकरून अनंतोपाध्यायांचा पुत्र काशिनाथोपाध्याय यांणें रचिलेलाजो धर्मसिंधुसार ग्रंथ त्याचा पहिला भाग समाप्त झाला.



## ॥ श्रीगणेशायनमः ॥

यत्कृपालेशमात्रेण मूकोपि धिषणायते ॥
तमहं परमात्मानं वंदे कामप्रदं प्रभुं ॥ १ ॥

अर्थ—ज्याच्या कृपालेशमात्रें करून मूकहि बुद्धिमत्तेप्रत पावतो, असा जो परमात्मा सकलाभीष्टद प्रभु त्यातें मी नमस्कार करितों.

श्रीपांडुरंगंविबुधांतरंगंनौमींदिरांमाधवमंदिरांच ॥
सतामनंतंहितमाप्तमनंतंगुरुंगरिष्ठंजननींवरिष्ठाम् ॥ १ ॥

ज्ञानी जे त्यांच्या अंतःकरणांत वास करणारा असा श्रीपांडुरंग, आणि माधव जो तोच आहे मंदिर जीचें असी लक्ष्मी, व साधूचें हित करणारा असा अनंतनामक श्रेष्ठ गुरु, आणि श्रेष्ठ असी माता या सर्वांला मी नमस्कार करितों.

काशीनाथाभिधेनात्रानंतोपाध्यायसूनुना ॥
सामान्यंनिर्णयंप्रोच्यविशेषेणविनिर्णयः ॥ २ ॥

अनंतोपाध्यायांचा पुत्र असा मी काशिनाथ, प्रथम परिच्छेदांत तिथि इत्यादिकांचा सामान्य निर्णय सांगून आतां या दुसऱ्या परिच्छेदांत विशेष निर्णय सांगतों.

संगृह्यतेधर्मसिंधुसाराख्येकालगोचरे ॥
ग्रंथेप्रस्फुटबोधायपुनरुक्तिर्नदूषणम् ॥ ३ ॥

सर्वांला यथार्थ बोध होण्याकरितां कालगोचर अशा ह्या धर्मसिंधुसारनामक ग्रंथामध्यें कोठें स्थलविशेषीं पुनरुक्ति येईल तर तो दोष असें मानूं नये.

*प्रथम परिच्छेदांत मासादिकांचा विशेष सांगितल्यावांचून सामान्येंकरून तिथि इत्यादि कांचा निर्णय सांगितला आहे. परंतु तितक्यानें निर्वाह होत नाहीं, म्हणून आतां या दुसऱ्या परिच्छेदांत चैत्रादिक बारा महिन्यांत कोणत्या तिथिचा कसा निर्णय आणि कोणकोणत्या तिथीला कोणकोणतीं कृत्यें करावीं, यांचा सर्व विशेष निर्णय, व प्रतिपदादिक ज्या तिथि त्यांचे ठिकाणीं विहित वार्षीककृत्यें कोणकोणतीं करावीं, हें सांगतों.*

दक्षिण देशांतील लोक बहुधा शुक्ल प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत महिना ग्रहण करि तात यास्तव त्याचाच आश्रयानें निर्णय सांगतों. या परिच्छेदांत क्वचितुस्थलीं प्रथम परिच्छेदांतील विषय आला आहे तो त्या त्या विशेषाच्या दृढीकरणार्थ लिहिला आहे

यास्तव तो पुनरुक्तिरूप दोष आहे असें लोकांनीं समजूं नये. मेषसंक्रांतीच्या पूर्वीच्या दहा व पुढच्या दहा, एकूण वीस घटिका पुण्यकाळ. संक्रांति मध्यरात्रीच्या पूर्वीं झाली असतां पूर्वदिवसाचें उत्तरार्ध पुण्यकाळ जाणावा. मध्यरात्रीनंतर संक्रांति होईल तर दुसऱ्या दिवसाचें पूर्वार्ध पुण्यकाळ. बरोबर मध्यरात्रीं संक्रांति होईल तर पूर्वदिवस आणि पुढचा दिवस असे दोन दिवस पुण्यकाळ.

## आतां तिथिनिर्णय सांगतों.

चैत्रशुद्ध प्रतिपदेच्या दिवसीं संवत्सराचा आरंभ होतो, त्याविषयीं प्रतिपदा सूर्योदयकालीं असेल ती घ्यावी. दोन दिवसीं सूर्योदयकालीं असेल किंवा दोन्ही दिवसीं सूर्योदयकालीं नसेल तर पूर्वदिवसाची घ्यावी. चैत्रमास हा अधिकमास आला असेल तर नूतन वर्षाला आरंभ झाला ह्मणून तैलाभ्यंग करणें, व संकल्पादिकांत नव्या वर्षाचा नामोच्चार करणें, हीं मलमास प्रतिपदेच्या दिवसींच करावीं. प्रत्येकानें आपापल्या गृहाचे ठिकाणीं ध्वजारोपण, निंबपत्रांचें भक्षण, संवत्सरफलाचें श्रवण, नवरात्राचा आरंभ आणि नवरात्रसंबंधी उत्सव, इत्यादिकांच्या निमित्तानें तैलाभ्यंग करणें हीं सर्व शुद्धमास प्रतिपदेच्या दिवसींच करावीं. नवीन वर्षाला आरंभ होतो या निमित्तानें तैलाभ्यंग करणें तोहि शुद्धमासाच्या प्रतिपदेच्या दिवसींच करावा, असें मयूखांत सांगितलें आहे. ह्या चैत्रशुद्ध प्रतिपदेच्या दिवसीं तैलाभ्यंग करणें हें नित्य आहे, आणि तो न केला असतां दोष आहे. ह्याच प्रतिपदेच्या दिवसीं देवीच्या नवरात्राचा प्रारंभ करावा. ह्या नवरात्राविषयीं प्रतिपदा घेणें ती द्वितीयेनें युक्त असी मुहूर्तमात्र असेल तथापि ती घ्यावी. एथें मुहूर्ताचें परिमाण असें—"दिवसाचा किंवा रात्रीचा कोणताहि पंधरावा जो भाग त्याला मुहूर्त असें ह्मणतात." याप्रमाणें सर्व ठिकाणीं मुहूर्त परिमाण जाणावें. ह्या देवी नवरात्राचा पारणादिक विशेष निर्णय शारद नवरात्रा प्रमाणें समजावा. ह्याच दिवसीं प्रपादान करावें. त्याविषयीं मंत्र—"**प्रपेयं सर्वसामान्या भूतेभ्यःप्रतिपादिता॥अस्याः प्रदानात् पितरस्तृप्यंतुहि पितामहाः**" ॥ "या मंत्रेंकरून चार महिने पर्यंत यथेच्छ प्राणिमात्रास पाणपोई घालून जलदान करावें, तेणेंकरून त्याचे पितर तृप्त होतात." चार महिने पर्यंत पाणपोई घालण्यास ज्याला शक्ति नसेल त्यानें दररोज ब्राह्मणाच्या गृहीं उदककुंभ द्यावा. त्याचा मंत्र—"**एष धर्मघटो दत्तो ब्रह्मविष्णु शिवात्मकः ॥ अस्य प्रदानात् सकला मम संतु मनोरथाः**" ॥ हीच प्रतिपदा कल्पादिहि आहे. याप्रमाणें वैशाखशुक्ल तृतीया, फाल्गुन कृष्ण तृतीया, चैत्रांतील शुद्ध पंचमी, माघशुद्ध त्रयोदशी, कार्तिकशुद्ध सप्तमी, आणि मार्गशीर्षशुद्ध नवमी ह्याहि तिथि कल्पादि आहेत असें जाणावें. ह्या कल्पादि तिथींचे दिवसीं श्राद्ध केलें असतां पितरांची तृप्ति होते. चैत्रशुद्ध

